# नवभारत

मार्च २०१२.

सार्वजनिक संस्थांच्या संस्थानिकीकरणाची संस्कृती : स्वरूप आणि पर्याय

दंडनीयता आणि

एक टिपणी :
अर्थशास्त्रज्ञांसाठी काही नीतिनियम असावेत का?

कविभूषण ब. ग. खापर्डे : ग्रंथसमीक्षा

नवे शिक्षण : नव्या दिशा, नवे ग्रंथ

अनुक्रमणिका










नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)








महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,

धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६

संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६१ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदानप्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे, असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित वाङ्‌मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता'ने पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयांतील ग्रंथालयात अद्ययावत पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील, असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयांतून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांनी आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल, त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रु. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

– संपादक मंडळ

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६५ । अंक ६ । मार्च २०१२
फाल्गुन/चैत्र शके १९३३-३४
वार्षिक वर्गणी ३०० रुपये
या अंकाची किंमत रु. २०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संग्रहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका






# नवभारत

## मार्च २०१२

## अनुक्रमणिका

# सार्वजनिक संस्थांच्या संस्थानिकीकरणाची संस्कृती : स्वरूप आणि पर्याय

डॉ. श्रीपाद भालचंद्र जोशी

नलिनी सिंग ह्यांनी दूरदर्शनसाठी सुमारे ३० वर्षांपूर्वी केलेल्या 'द कॅप्चरिंग' वरील वृत्तचित्राने भारतीय लोकशाहीतील सर्वाधिक पवित्र अशा प्रौढ मताधिकाराचे प्रत्यक्षात नियंत्रण करणाऱ्या व मतांचीच लूट करून लोकशाहीची संस्थात्मक व्यवस्था मुळापासूनच पळवून नेऊन आपल्या दावणीला बांधणाऱ्या वास्तवाचे विदारक दर्शन घडविले होते.

आपले एक माजी पंतप्रधान चंद्रशेखर यांच्यासारख्या लोकशाही, समाजवादी व गांधीवादी जीवनादर्शाला बांधील अशा सच्च्या पुढाऱ्यालादेखील त्या वेळी समकालीन राजकारणातील आदर्शवाद्यांना सत्ता प्राप्त करायची तर या वास्तवाशिवाय पर्याय उरलेला नसल्याचे जे विधान करावे लागले होते, तिथपासून तो महाराष्ट्राचे विद्यमान मुख्यमंत्री पृथ्वीराज चव्हाण यांनी आपल्या मंत्रिमंडळातील काही मंत्री स्वतःला राज्याचे मालकच समजतात, ह्या केलेल्या विधानापर्यंत गेली तीन-चार दशके आपल्या जीवनातील सर्वच प्रकारच्या संस्थांतर्गत लोकशाहीचे स्वरूप हे असे विकृत होत आले आहे. त्या त्या संस्थेचे संचालन, नियंत्रण, सार्वजनिक, संस्थात्मक अंतर्गत सत्ता, सर्वोच्च पदे, कार्यकारी पदे, लाभाची पदे इ. प्राप्त करण्यासाठी केवळ मतदानच अनिष्ट मार्गाने प्रभावित करणे नव्हे, तर सर्वंकष पद्धतीने, संस्थांचे, विशिष्टच सत्ताकांक्षी व्यक्ती व त्यांच्या टोळ्या यांच्या हाती संस्थानिकीकरण करून व त्या त्या टोळ्यांचे आश्रित बनूनच संस्थात्मक जीवनाचे आपल्याला हवे असणारे सर्व प्रकारचे व्यक्तिगत, व्यावहारिक लाभ मिळवता येऊ शकतात. अन्यथा आपण सर्व लाभांपासून वंचित अशा 'आदर्श' व 'सज्जन' जमातीत फेकले जाऊ या धारणेनेच आपल्या संस्थात्मक लोकजीवनाचा ताबा घेतला गेला आहे.

केवळ राजकीय सत्ताच नव्हे तर अगदी साहित्य संस्थांच्या निवडणुका असोत की, साहित्य संमेलनांच्या, सत्ताप्राप्तीच्या, अध्यक्षपदाच्या, सहकारी सोसायट्यांच्या असोत की, बार कौन्सिलच्या. विशेषतः जिथे जिथे पोस्टल बॅलेट पद्धतीची मतदानप्रक्रिया असते, अशा बहुतांश संस्थांमधून तर वर्षानुवर्षे स्वतःला त्या संस्थांच्या सर्वोच्चपदी आणि अधिकारांच्या पदांवर टिकवून धरण्याच्या पदलालसेपोटी अथवा विद्यमान नेतृत्वाला हुसकावून लावून त्या जागी आपली प्रतिष्ठापना करू बघणाऱ्या, तथाकथित विरोधकांच्या विरोधी गटांनीही व त्यांच्या समर्थक मतदारांनीही 'स्वेच्छेने' अवलंबिलेली मतदानाची पद्धत ही मतदाराची स्वाक्षरी असलेल्या मतपत्रिकांचे लिफाफे गोळा करण्याचीच व या प्रकारच्या, 'लोकशाही पद्धतीने' निवडून येणाऱ्यांची 'निवड' घोषित करण्याचीच आहे. हे आपणा साऱ्यांना, अगदी त्या निवडणुकांच्या निर्वाचन अधिकाऱ्यासकट साऱ्यांना ठाऊक असते. लागोपाठ कितीतरी 'टर्म' या पद्धतीने स्वतःला त्या संस्थांच्या अधिकारपदांवर टिकवून धरण्याचा केलेला 'विक्रम' माध्यमांमधून मिरवण्याची सर्वमान्य लोकशाही ही तुमच्यामाझ्यासकट आपण साऱ्यांनीच आपल्या संस्थात्मक जीवनपद्धतीचा भाग म्हणून निमूटपणे स्वीकारलेली आहे.

'पोस्टल बॅलेट' पद्धतीतील संस्थांचे हजारो 'मतदार'-सदस्य हे तर बहुतांश, ज्यांची वर्गणीदेखील त्यांच्या वतीने त्या त्या संस्थांमधल्या सत्ताकांक्षी, पदलालसा बाळगणाऱ्यांनी केलेल्या गटांमधल्याचे कोणीतरी त्यांच्या वतीने भरलेली असते, असेच असतात. आपले पैसे लावून, आपण सदस्यनोंदणीत 'गुंतवणूक' करून 'उभारलेल्या' संस्थांचे लाभ आपण न घेता ते इतरांना देण्यासाठी आपण काही संत नाही असे सांगणारे संस्थाप्रमुख व त्यांच्या अशा नेतृत्वकुशलतेचे गोडवे गाणारे त्यांचे 'लेखनिक' हे आजचे संस्थात्मकतेचे अनेक संस्थांमधले वास्तव आहे आणि तेच खरेतर मोठ्या प्रमाणावरील वास्तव आहे.

अशा अनेक संस्थांमधून सदस्यसंख्येच्या तुलनेत

अनुक्रमणिका






प्रत्यक्षात जमा रक्कम तपासून बघितल्यास वर्गणीच्या रकमा प्रत्यक्षात न भरल्या जाताही सदस्य म्हणून नोंदले गेलेले, मतदार झालेले व त्यांनी 'मतदान' करून झालेले दिसेल. याची तपासणी करण्याची प्रत्यक्ष वेळ येईल, तेव्हा त्या त्या काळातली संबंधित पावतीपुस्तकेदेखील अनेक ठिकाणी गहाळ झालेली दिसतील. काही 'मतदार' हे त्या त्या संस्थांच्या नियमात निर्दिष्ट कालावधीत आणून 'बसवलेले' व 'नियमानुसारच झालेले' दिसतील.

वर्षानुवर्षे सार्वजनिक संस्था आपल्या ताब्यात राखून संस्थांच्या संस्थानिकीकरणाचा कळस गाठण्यासाठी मुळात हाच पाया अगोदर मजबूत असावा लागतो. तो तसा राखण्यानेच संस्थांची संस्थाने करून ती काही विशिष्टच व्यक्तींच्या व व्यक्तिगटांच्या हाती वर्षानुवर्षे केंद्रित करता येतात व तसे कुशलपणे करणे म्हणजेच संस्थात्मक विश्वाचे 'समर्थ' व 'सक्षमपणे' नेतृत्व करणे ही सार्वजनिक संस्थात्मक विश्वाच्या 'सक्षम' नेतृत्वाची आज प्रत्यक्षात 'सर्वमान्य' व्याख्या झालेली आहे.

ही व्याख्या जोवर आपल्याला मान्य असते व ती मान्य असणाऱ्यांच्या टोळीचा आपण भाग असतो व ते निमूटपणे आपण मान्य करतो, तोवर आणि तोवरच आपण अशा संस्थांच्या संस्थात्मक जीवनाचाही त्यांच्यासोबत 'सन्माननीय' भाग असू शकतो.

आपल्यातल्या जवळजवळ साऱ्यांनीच, अगदी आदर्श संस्थात्मक जीवनावर जाहीर भाषणे देणाऱ्यांनीही प्रत्यक्षात मात्र ह्या प्रकाराचा स्वीकारच केलेला असतो. केवळ सैद्धांतिक विवेचक गप्पांनी सुटणारे हे प्रश्न नसून प्रत्यक्षात उपयोजनांच्या पातळीवरचे संस्थात्मक वास्तव काय आहे ते निःसंकोचपणे व व्यक्तिनिरपेक्ष रीतीने आधी चर्चेला येणे महत्त्वाचे आहे. तेच करायचे नाही, असा आपला साऱ्यांचा परस्परांशी अलिखित करारच झालेला आहे. खासगीत तेवढी संस्थांची संस्थाने करून सोडणाऱ्यांच्या दुष्कृत्यांची तीच ती चर्चा वारंवार करायची, मात्र त्यावर सार्वजनिकरीत्या नेतृत्व बहाल करण्याशिवाय पर्यायच नाही. त्यामुळे संस्थात्मक जीवनात टिकून राहायचे तर संस्थांचे संस्थानिकीकरण करणाऱ्यांनाच 'आदर्श'-संस्थात्मक नेतृत्व मानूनच व तसे करण्याच्या सर्वच तंत्र, मंत्र, उपाय, मार्ग, पद्धती आत्मसात करूनच टिकावे लागते. हे आपल्या संस्थात्मक जीवनाचे विद्यमान स्वरूप आहे.

संस्थात्मक जीवनाचा हा असा पायाच उद्ध्वस्त करायचा असेल तर त्या जागी नव्या आदर्श अशा ज्या कोणत्या पद्धतीचा अवलंब करायचा, त्या पद्धतीद्वारादेखील संस्थानिकीकरण करणाऱ्या वृत्ती-प्रवृत्ती संस्थांचे संस्थानिकीकरण त्याही पद्धतीद्वारे करणारच नाहीत, याची काय खात्री? त्यामुळे तसा विचार करणेदेखील आज आपण सोडूनच दिले आहे. तसा विचारदेखील करू बघणारे हे 'लोकशत्रू', संस्थांचे 'शत्रू' ठरवले जात आहेत. त्यांच्याबद्दल, त्यांच्या कार्यकर्तृत्वाबद्दल नितांत आदर बाळगणाऱ्यांचेदेखील 'बहुमत' हे शेवटी संस्थांमधून त्यांच्या विरुद्धच जाते. संस्थांच्या घटना, उद्देश, नियम, संकेत, परंपरा या साऱ्यांच्या विरोधात जाऊनही, 'बहुसंख्येने', तथाकथित 'बहुमताने' घेतले जाणारे निर्णय हे कितीही अवैध, बेकायदेशीर, घटनाबाह्य असले, तरीही ते बहुमताचे आहेत एवढ्या एका मुजोरीने ते निगरगट्टपणे रेटून नेण्याचे असभ्य बळ या प्रक्रियेने या लोकशाहीला प्रदान केले आहे.

मात्र इब्सेनच्या 'एनिमी ऑफ द पीपल' या नाटकात वर्णिलेले असे 'लोकशत्रू', असे 'वैरी' अधिकाधिक संख्येने निर्माण झाल्याशिवाय ही 'कोंडी' देखील फुटणार नाही, हेदेखील तेवढेच खरे आहे.

कारण आपले संस्थात्मक जीवन हे कधीच आदर्श नव्हते वा असूच शकत नाही, असे नाही. सार्वजनिक संस्थात्मक जीवनातल्या आदर्शाचा पुरावा उपलब्ध करून देणारा इतिहास उपलब्ध आहे. कितीतरी शिक्षकांनी आपली घरे-दारे, दागदागिने गहाण टाकून शिक्षणसंस्था उभ्या केल्या आहेत, सार्वजनिक संस्थांमधून आदर्श संस्थात्मक व्यवहाराचे आदर्श घालून देण्यासाठी कितीतरी पिढ्यांतील कितीतरी लोकांनी दारिद्र्य पतकरून, घरादारांवर निखारे ठेवून, घरा-दाराला, मुला-बाळांना द्यायचा वेळ संस्थांसाठी देत, निर्मोही वृत्तीने संस्थात्मक जीवनाचा पाया इतिहासात घातला आहे. या पायावर उभ्या असणाऱ्या आजच्या सार्वजनिक संस्थात्मक व्यवहाराच्या इमारतीचे तथाकथित 'निर्वाचित' सूत्रधार मात्र स्वतःला संस्थांचे सेवक नव्हे तर मालक समजून, 'साहेब' समजून, त्या

थाटातच मिरवू लागले आहेत. संस्थांचा अत्यंत तुटपुंज्या वेतनावरचा अल्पकालीन सेवकवर्ग हा प्रत्यक्षात पूर्णकालीन पद्धतीने राबवून, चोवीस तास हवा तसा आणि आपल्या घरगुती व खासगी कामासाठी वापरून घेणे हा हे संस्थानिक आपला हक्क समजू लागले आहेत. तसे मान्य नसेल, तर ते काम सोडून जायला सांगू लागले आहेत. उद्दामपणा आणि मुजोरी ही अशांना आपली आभूषणे वाटू लागली आहेत.

सार्वजनिक संस्थात्मक जीवन व व्यवहार आज आहे तसाच तो काल नव्हता; त्यामुळे आहे हे असेच चालणार व त्याला आपल्याला शरण जावेच लागणार, हा ढोंगी प्रचार करणारे हे फक्त आपल्या वैयक्तिक लाभाची, अनुदान, मानधन, पुरस्कारांची, देशी-परदेशी वाऱ्यांची व सार्वजनिक पैशावर वैयक्तिक चंगळ व अधिकाधिक लाभ ओरबाडून घेण्याची स्पर्धा तेवढी चालवीत असतात, हे लक्षात घेणे गरजेचे आहे.

महाराष्ट्र हा कालपरवापर्यंत आदर्श संस्थात्मक जीवनासाठी सर्वस्व पणाला लावणाऱ्या त्यागी लेखक-कलावंत-नेतृत्व-विचारवंत-कलावंत-शिक्षक-पत्रकार कार्यकर्ते यांचा भूभाग म्हणून ओळखला जात होता. त्या जागी तो आज त्यांच्यातल्या व त्यांच्यातल्या नसणाऱ्याही स्वार्थी, लोभी लोकांचा भूभाग म्हणून ओळखला जाऊ लागला आहे.

सांस्कृतिक स्वायत्तता व अभिव्यक्तीच्या स्वायत्ततेसाठी रण माजवणारे लेखक-कलावंत-विचारवंत-पत्रकार हे महाराष्ट्राचे वैशिष्ट्य होते. लेखक, विचारवंतांच्या संस्थांमधून शिरणाऱ्या असामाजिक, अवाङ्मयीन दुष्प्रवृत्तींच्या विरोधात सामूहिकरीत्या दंड थोपटणारा प्रदेश म्हणून महाराष्ट्राची ख्याती होती.

स्वयंसेवी, सेवाभावी संस्थांमधून जो सेवाभाव खरोखरच हयात होता, तो आज बहुतांश ठिकाणी मरण पावला आहे. समाजकार्याला निष्ठेने वाहून घेतलेल्या काही अपवादात्मक संस्थांमध्येच तो हयात असू शकतो; नाही असे नाही. मात्र हा अपवाद झाला. सेवाभावी संस्थांमधले कार्यकारी, पदाधिकारी आपल्याला संस्थांचे सेवक नव्हे तर मालक समजून त्या तोऱ्यातच वागू लागले आहेत. त्यांना 'साहेब' म्हणूनच संबोधले जाते व त्यातच त्यांना आनंद वाटतो आहे. संस्थांचे संस्थानिकीकरण करणाऱ्यांच्या संमेलनांना, मेळाव्यांना 'समांतर' संमेलने, मेळावे उभा करणारा प्रदेश महाराष्ट्रच होता. संस्थांचे संस्थानिकीकरण करणाऱ्यांना पायउतार करणारी संस्थात्मक बंडे उभारून ती यशस्वी रीत्या निकाली काढणारा प्रदेश म्हणून महाराष्ट्र ख्यातनाम होता. आज हे वास्तव नेमके उलट दिशेने वेग घेत चालले आहे.

सार्वजनिक संस्थात्मक जीवनाचे विदारक वास्तव व त्याच्या मानवी जीवनावरील परिणामांबाबत एके काळी लेखक-कलावंत तरी संवेदनशील होते. मात्र वसंत कानेटकरांचे 'अश्रूंची झाली फुले' किंवा विजय तेंडुलकरांचे 'पाहिजे जातीचे', गो. पु. देशपांड्यांचे 'उद्ध्वस्त धर्मशाळा' किंवा 'वैरी', 'कोंडी' अशा समर्थ नाट्यकृतींचे अपवाद वगळता पलीकडे मराठी लेखकांचे सार्वजनिक संस्थात्मक जीवन व त्याचा मानवी भावजीवन, लोकशाही मूल्य यांवर पडणारा सखोल व व्यापक परिणाम याबद्दलची संवेदना नुसतीच बोथट नव्हे तर बधिरच झालेली दिसते. त्याचे कारण त्यांना अशा प्रकारची सामाजिक बांधिलकी बाळगण्याऐवजी तिचे ओझे फेकून मोकळे होण्यातच आपले लेखकपण आणि त्याचे व्यक्तिगत आनुषंगिक व्यावहारिक लाभ सुरक्षित असण्याचा साक्षात्कार होत गेला यात आहे. परिणामी त्यांच्या संस्थाही त्यांच्या उरल्या नाहीत, त्यांच्या नावावर त्या त्यांच्यातल्या मुनिमांच्या बटीक झाल्या. कितीतरी लेखक अशा संस्थांमधून निर्णय घेणारे नव्हे तर त्या प्रत्यक्षात चालवणाऱ्यांचे फक्त 'लेखनिक' म्हणून आज वावरताना दिसतात. त्याचेही त्यांना फारसे सोयरसुतक उरले नाही. कारण त्यांच्या वैयक्तिक व्यावहारिक लाभांची ते संचालक काळजी घेऊ लागले. लेखक-कलावंत-विचारवंतांच्याही संस्थांमधून त्यामुळे सार्वजनिक संस्थात्मक जीवनाचा दर्जा आणि गुणवत्ता यांची वेगाने पीछेहाटच होत गेली.

"कोणत्याही कामाच्या पद्धतीत पारदर्शकता निर्माण व्हायला हवी" म्हणून सांगणारे, 'सज्जन' शक्तीचे पुरस्कर्ते असोत, स्वच्छ पांढऱ्या कपड्यांतले असोत, सुटाबुटांतले असोत, पायघोळ पायजम्यातले वा अन्य कोणत्याही पोशाखातले; ते ज्या संस्थांचे नेतृत्व करतात त्याच संस्थांतल्या प्रत्यक्ष वर्तनाच्या पातळीवर मात्र टोकाची

'अपारदर्शिता', 'गोपनीयता' जपली जाते. टोकाच्या व्यक्ति-केंद्री, एककल्लीपणाने चाललेला जो व्यवहार, गैरव्यवहार असतो त्याला वळण लावण्याऐवजी वा आळा घालण्या-ऐवजी, त्या विरोधात स्पष्टपणे भूमिका घेण्याऐवजी त्याला एकतर संरक्षणच देणारे व अशा व्यवहारकर्त्यांचे व आपले 'स्थानमाहात्म्य' सुरक्षित राखणारेच त्यांचे वर्तन असते. अशा व्यवहारांच्या विरोधात उभे ठाक-णाऱ्यांना एकाकी पाडण्यात तेदेखील सक्रिय असताना दिसतात.

ज्यांना ते वर्तन तसे ठेवायचे नसते, ते कोणतेही थातुरमातुर 'नैमित्तिक' कारण पुढे करून राजीनामे देऊन स्वतःच्या संस्थात्मक जबाबदारीतून शांतपणे सुटका करून पळ काढताना दिसतात. मात्र त्यानंतरही सज्जन शक्तीने संस्थात्मक अपप्रवृत्तीविरुद्ध, गैरव्यवहारांविरुद्ध, संस्था-त्मक भ्रष्टाचाराविरुद्ध लढलेच पाहिजे असे उपदेश करणारी त्यांची सार्वजनिक भाषणे सुरूच असतात.

अशा अनेक थोरामोठ्यांच्या 'सज्जन' नाकाखाली त्यांच्याच संस्थांत, सार्वजनिक रीत्या त्यांच्याच पाया पडणारे अनुयायी, त्यांच्याच संस्थांचे भूखंड, त्यांच्याच अनुमतीने संस्थांच्या उद्दिष्टांच्याच पूर्तीच्या नावावर 'कार्-पोरेट' असो की स्थानिक बाजारांच्या शक्तींच्या वा व्यक्तिंच्या हाती बिनदिक्कतपणे सोपवतानाही दिसतात. संस्थांची उद्दिष्टे मात्र त्यानंतरही वर्षानुवर्षे तिळभरही पुढे सरकताना दिसत नाहीत. फार क्वचित बोटावर मोजण्याइतक्या संस्था आज याला अपवाद उरल्या आहेत आणि ज्या तशा आहेत, त्यांना 'कर्तृत्ववान' समजले जात नाही. उलट, त्या संचालित करणाऱ्या मंडळींमध्ये तसले 'कर्तृत्व' नसल्यानेच त्या 'मागासलेल्या' असल्याचे सांगण्यात येते. अशा 'मागासलेल्यांच्या' हातून त्या काढून घेऊन, त्यांना हुसकावून लावून त्या जागी संस्थेच्या विकासाच्या नावावर तिचे अपहरण करून त्या आपल्या हितांचेच तेवढे रक्षण करणाऱ्या पदाधिकाऱ्यांच्या हाती कशा राहतील वा आपणच तिचे प्रमुख कसे राहू शकू, असे व्यवस्थापन व त्यांनाच 'कुशल संस्थाचालक' समजण्याची उदाहरणे आपल्या अवतीभवती भरपूर विखुरलेली आहेत.

प्रत्यक्षात पारदर्शिता हवी असणाऱ्यांना ती आहे याचे प्रदर्शन वा घोषणा करून ती दाखवावी लागत नाही; तर ती अनुभवाला येऊ देणे आवश्यक असते. दुर्दैवाने ती फक्त प्रदर्शित केली जाते, तिच्या घोषणा होतात; फक्त ती आपल्या संस्थात्मक जीवनात अनुभवाला तेवढी आज येत नाही.

याचा अर्थ स्वच्छ, आदर्श, पारदर्शी, सार्वजनिक, संस्थात्मक जीवनाची या आत्यंतिक लोभाच्या व प्रच्छन्न व्यक्तिवादाच्या युगात गरजच उरलेली नाही, असे आपल्याला वाटू लागले आहे काय? केवळ कोणाच्यातरी, कुठल्यातरी लोभाच्याच, मोहाच्याच बाजूचेच तेवढे आपण झालो आहोत? जागरूक नागरिक म्हणून, राज्यसंस्थेचे सदस्य म्हणून व ज्या कोणत्या संस्थेचे ज्या ज्या वेळी व जिथे जिथे आपण पदाधिकारी वा सदस्य असू, तिथे तिथे तिथले केवळ लाभ तेवढे हवेत मात्र आपली ठाम अशी भूमिका, जबाबदारी, कर्तव्य असे काही आपल्याला मुळातच का नको आहे? की कोणत्याच प्रकारच्या संस्थांची, संस्थात्मक जीवनाची, सार्वजनिक जीवनाची आपली गरजच मुळात संपुष्टात आली आहे? आणि त्यामुळे सार्वजनिक व संस्थात्मक जीवनाला कोणतेच व कसलेच वळण लावण्याची आपल्याला गरजच उरलेली नाही व त्यामुळे ती आपली जबाबदारी वा कर्तव्याचा भागच नाही अशी आपण आपली सोयीस्कर समजूत करून घेतली आहे?

या परिषदेचा उद्देश आपल्या संस्थात्मक सार्वजनिक जीवनातील वर्तनाची, जबाबदारीची, बेजबाबदारपणाची, संस्थात्मक जीवन उद्देशविहीनतेकडे रेटत नेण्याच्या वृत्तींची तपासणी करण्याचा आहे. त्यांच्या संभाव्य भीषण व भयावह परिणामांची जी जाणीव व संवेदनाच आपण हरवून बसलो आहोत त्याची; त्यातून उत्पन्न होत असलेल्या दहशतीची व त्यामुळे काही विशिष्टच वृत्ती-प्रवृत्तीच्या लोकांकडून आपले संस्थात्मक सार्वजनिक जीवन जे 'हायजॅक' केले जात आहे, पळवले जाते आहे, ताब्यात घेतले गेले आहे त्याची तपासणी व्हावी, हा या परिषदेचा उद्देश आहे.

सार्वजनिक संस्था चालवणे हे केवळ अशा संस्था 'हायजॅक' करण्याची 'क्षमता' असणाऱ्यांचेच तेवढे क्षेत्र असल्याचा व तसे करणारेच संस्थाचालक हे 'कुशल'

समजण्याचा जो बुळा समज सार्वत्रिक सिद्धांताच्या स्वरूपात मान्यता पावतो आहे त्याची चिकित्सा व्हावी, त्यावर कडकडून काही बोलले, केले जावे याची गरज वाटावी की वाटू नये? असे प्रश्न उपस्थित करणे हा-देखील या परिषदेचा उद्देश आहे. या प्रश्नांची चिकित्सा, विवेचन व त्या दृष्टीने जनमतजागृती हा सामाजिक अग्रक्रमाचा विषय होऊ शकतो की नाही? व्हावा की नाही व का होऊ नये? यावर कोणी नव्याने पुनः विचार करायचा की नाही?

संस्थात्मक सार्वजनिक जीवन हे व्यक्तीच्या छोट्या-मोठ्या गटांमधून चालणारे व आकारास आणले जाणारे सार्वजनिक वर्तन असते. कुठल्यातरी वांछित सामाजिक-सांस्कृतिक उद्दिष्टांसाठी अशा व्यक्तींचे कार्य चालावे व त्यातून आपोआपच अवांछित सामाजिक जीवन व त्यास बळ देणाऱ्या वृत्ती-प्रवृत्ती बाजूला सारल्या जाव्या असे जनमत उभारले जावे अशी या प्रक्रियेची परिणती असावी, असे अपेक्षित असते. ही अपेक्षा पूर्ण होण्याचा अर्थच निकोप सांस्कृतिक लोकशाही उभारली जाणे असा आहे. याचा दुसरा अर्थ ही अपेक्षा पूर्ण न होणे म्हणजे लोकशाही व संस्कृती निकोप न उरता ती सामाजिक अनारोग्य निर्माण करणारी, रोगट व विकृत होत जाणे, पर्यायाने लोकशाहीची जागा ही सार्वजनिक अनास्थेतून उत्पन्न होणाऱ्या गैरलोकशाही वृत्ती व असांस्कृतिक वर्तनाने घेतली जाणे असा होतो.

अशा प्रकारच्या सार्वजनिक वर्तनातून लोकहिताच्या संस्था व लोकशाहीच्याच नावाने तिला मुळातच पोखरणाऱ्या वर्चस्ववादी वृत्ती निर्माण होतात. त्या आज सर्वत्र मोठ्या प्रमाणावर निर्माण होऊन समृद्ध व संपन्नही झालेल्या आहेत. पर्यायाने, संस्थांतर्गत लोकशाही व तिला आवश्यक वर्तन मोठ्या प्रमाणावर आज संपुष्टात आणल्या गेल्याच्या परिणामी सामूहिक विवेकाऐवजी सामूहिक अविवेकाचेच बळ वाढलेले आहे. याचा आपण विचार करायचा की मुळातच लोकशाही आपल्याला नको आहे व म्हणून ती घालविण्यासाठी जाणूनबुजूनच आपण आपले सामाजिक वर्तन आज जसे चालले आहे तसे करीत आहोत असे समजायचे?

लोकशाही ही खालून वर जाणारी प्रक्रिया आहे, असायला हवी आहे. प्रत्यक्षात ती वरून खाली आलेली अशी वर्चस्ववादी संस्थात्मक यंत्रणा झालेली आहे व हे सार्वजनिक जीवनातील जवळजवळ प्रत्येकच लहान-मोठ्या संस्थांच्या जीवनातले आपले, संस्थात्मक व सार्वजनिक, सर्वमान्य वर्तन झालेले आहे.

केवळ नेतृत्वावर दोषारोपण करून प्रत्येक वेळी नेतृत्वबदल मागणारी लोकशाही ही लोकशाही किती व अधिनायकशाही किती, हे प्रश्नदेखील आपण आपल्याला विचारणार आहोत की नाही?

आपल्या लहानमोठ्या विविध प्रकारच्या सार्वजनिक संस्था आज खरोखरच लोकशाही पद्धतीने चालविल्या जात आहेत काय? की अधिनायकशाही पद्धतीने? याची शास्त्रीय संशोधनपद्धतीने तपासणी करून त्याचे निष्कर्ष सार्वजनिक हितार्थ जाहीर करणारे संशोधनकार्य हाती घ्यावे असे आपली समाजकार्य महाविद्यालये, त्यातील अभ्यासक, समाजशास्त्राचे अध्यापक, अभ्यासक, सामाजिक मानसशास्त्र वा लोकप्रशासन, राज्यशास्त्र इ. ज्ञानशाखांतील अभ्यासकांना का वाटेनासे झाले आहे? विविध प्रकारच्या सार्वजनिक संस्थागत जीवनाशी संबद्ध लोकसंख्या आज फार मोठी आहे व तीच खऱ्या अर्थाने 'ओपिनियन लीडर' असलेली मंडळी आहेत व ह्याच मंडळींना त्यांच्या सार्वजनिक, संस्थात्मक जीवनाचा प्रत्यक्षात स्तर काय व कसा आहे, हेदेखील ठाऊक आहे.

संस्थांच्या मूळ उद्दिष्टांना बांधील असण्याऐवजी, त्यासाठी आवश्यक ते कौशल्य, पात्रता, दृष्टी असण्या-ऐवजी केवळ चाणाक्ष, धूर्त, केवळ क्षुद्र व क्षुल्लक स्वार्थासाठी 'राजकीय' पद्धतीने परिस्थिती हाताळू शकण्याची क्षमता असणारा, या बोटाची थुंकी त्या बोटावर सहजपणे करणारा, प्रसंगी बेमालूम खोटे हे खरे वाटावे अशा रीतीने बोलणारा, 'डिप्लोमॅटिक' वर्तनात प्रवीण, परस्परांमध्ये भांडणे लावून देऊन समस्या कायम राखणारा व त्यांची सोडवणूक करण्याचे कार्य मात्र मानभावीपणाने स्वतःकडे ओढवून घेणारा, दुसऱ्यास ठाऊक न होऊ देता इतरांकडून सारेकाही करवून घेणारा व ते अंतिमतः आपल्या नावावर खपवून आपणच ते घडवून आणले असे भासविणारा, संस्थेची घटना, नियम, उद्देश यांना

प्राधान्य देण्यापेक्षा आपली व्यक्तिगत प्रतिमा व हित यांना अग्रक्रम लाभेल अशाच प्रकारच्या कार्याची तशाच रीतीने आखणी करणारा; संस्थेतील कार्यकारी सदस्यांना कामास लावण्याऐवजी, त्यांना प्रत्यक्षात काम करू देण्याऐवजी ते न करता केवळ पद व त्याद्वारे लाभणारी प्रतिष्ठा व काही व्यक्तिगत लाभ यांची सोय करून देणारा व त्यायोगे कार्यकारी सदस्यांचे स्थान त्या संस्था-प्रमुखाची व्यक्तिगत मर्जी व व्यक्तिपूजेच्या आधारे सुरक्षित राखण्याची काळजी घेणारा, पारदर्शी व्यवहारांच्या केवळ घोषणा करून प्रत्यक्षात अवांछनीय गुप्तता बाळगणारा, संस्थेस कमीत कमी अथवा मुळीच वेळ न देता घरबसल्या केवळ निर्णयप्रक्रिया तेवढी आपल्या हाती राखणारा, सामूहिक निर्णयाऐवजी केवळ व्यक्तिगत पद्धतीने मनःपूत-रीत्या निर्णय घेऊन त्यामागे इतरांना खेचत येण्यास भाग पाडणारा असा संस्थाप्रमुख हे आज बहुतांश सार्वजनिक संस्थात्मक जीवनातले वास्तव आहे. सार्वजनिक संस्थांच्या जीवनातील हे 'सार्वजनिक सत्य' आहे. अशा रीतीने स्वतःला तहहयात टिकवून ठेवणारा व निर्लज्जपणे पदाला चिकटून राहणारा संस्थाप्रमुख हा 'यशस्वी' व 'क्षमता' असलेला मानण्याचा आपल्या सार्वजनिक संस्थात्मक जीवनाने प्रघात पाडलेला आहे.

केवळ वेळ मारून नेणारी उत्तरे, धूर्त व चाणाक्षपणे देण्याची क्षमता, केवळ माणसे खेळवण्याची क्षमता, कोणत्याही मार्गाने का होईना स्वतःस चर्चेत राखण्याचे प्रयत्न, प्रसिद्धीतंत्राधारे बऱ्यावाईट कशाही मार्गाने स्वतःस प्रकाशझोतात राखण्याची सिद्धी, आकर्षक, चटपटीत घोषणाबाजी करून वेळ मारून नेणे ह्या बाबी अवगत असणे म्हणजे 'यशस्वी' संस्थाचालक असणे असे अवांछित वातावरण आपल्या संस्थात्मक सार्वजनिक जीवनात निर्मिले गेले आहे.

संस्थेच्या उद्देशांच्या पूर्तीकरता असलेल्या साधनांची उभारणी करण्याची गरजच मग अशा ठिकाणी संपुष्टात येत असल्याने त्या त्या संस्थांपासून खऱ्या अर्थाने संबंधित असायला हवे असे लोक मुळातच दुरावलेले असणे व संस्थांमधील वातावरण अनुत्साहाचे असणे हे पर्यायाने आलेच. किंबहुना ते तसे असणे हेच अशा संस्थाप्रमुखांच्या व त्यांच्या गटांच्या व गोटांच्या व्यक्तिगत हिताच्या धोरणाचा भाग झालेले असते व तसे जाणीवपूर्वकच केले जात असते. वातावरण असे करून झाल्यावर त्याचे दोषारोपण मात्र लोकांच्या उदासीनतेवर करून आपणच तेवढे 'जबाबदार' व अन्य सारे 'बेजबाबदार' असे भासविणारा संस्थाप्रमुखांचा हा वर्ग सार्वजनिक जीवनास आकार देण्याऐवजी ते जीवन 'निराकार' व 'निर्गुण' करण्यातच हातभार लावतो आहे. अशा 'नीरस', 'निराकार' व 'निर्गुण' अवस्थेत आजचे आपले संस्थात्मक, सार्वजनिक जीवन आणून ठेवले गेले आहे आणि वर असे वातावरण निर्मिणाऱ्यांना 'सांस्कृतिक नेते', 'सांस्कृतिक पालक', 'सामाजिक नेते', अशा पदव्या बहाल करणाऱ्यांचे गावोगावी पेव फुटले आहे. संस्थेचे उद्देश, घटना, नियम, संकेत, परंपरा ह्यांची बिनदिक्कत पायमल्ली करणे हा जणू संस्थांचे कार्यप्रमुख व त्यांच्या अशा वर्तनातच ज्यांचे हित दडले आहे असे त्यास पाठिंबा देणारे, हे अशा व्यक्तीलाच पुनःपुन्हा संस्थाप्रमुख म्हणून स्वीकारण्यास इतरांचेही 'इमोशनल ब्लॅकमेलिंग' करून त्यांना भागही पाडतात. अशांच्या तावडीत सापडलेल्या अनेक संस्था आपल्या उद्दिष्टांपासून कितीतरी दूर जाऊन अशा काही प्रमुखांच्या व त्यांना तेथे आणून, बसवून ठेवण्यात हितसंबंध गुंतलेल्यांच्या तेवढ्या बटीक केल्या गेल्याची उदाहरणे आपल्या संस्थात्मक, सार्वजनिक जीवनात आपल्या अवतीभवती काही थोडीथोडकी नाहीत.

संबंधित संस्थांच्या सदस्यांची आपआपल्या संस्थांच्या संबंधातील घोर अनास्था; किंबहुना अशा आस्थाविहीनांनाच तेवढे निवडून अग्रक्रमाने त्यांनाच संस्थांचे सदस्य केले जाणे हे प्रामुख्याने अशा प्रकारच्या सार्वजनिक वातावरणाच्या निर्मितीचे एक प्रमुख कारण. अशा कार्यप्रमुखांनी ठरवून चालविलेल्या अशा वर्तनातूनदेखील संस्थेतील सदस्यांची अनास्था आपल्या सार्वजनिक जीवनात उदयाला येते.

कोणत्याही संस्थेतील प्रमुखाचे कार्य हे त्या संस्थेतील क्रियाशील कार्यकारी व अन्य सदस्यांमध्ये कार्याचा उत्साह फुलविणे, त्यांना उद्दिष्टांनुसार संस्थेच्या उद्दिष्टपूर्तीच्या दृष्टीने सतत कार्योत्तेजक राखणे, कार्यप्रवृत्त करणे हे असते. त्यासाठी कार्यप्रमुखांचा व सदस्यांचा कृतिशील संवाद-सहवास यांची गरज असते. मात्र त्याऐवजी आज

आपल्या सार्वजनिक जीवनाचे चित्र अगदी विपरीत झाले आहे. संवादाऐवजी असे संस्थाप्रमुख विसंवादच अधिक निर्माण करीत आहेत. त्यातच त्यांचे हित दडलेले आहे.

प्रश्न आहे तो ह्यातून मार्ग काढण्याची खरोखरच आपली इच्छा आहे काय हा. तशी इच्छा असल्याचे भासवणाऱ्या व प्रत्यक्षात मात्र संस्थेत पदप्राप्तीच्या संभावना संपुष्टात येताच चट्‌कन नाहीसे होणाऱ्या व्यक्ती हेदेखील वास्तव या संस्थात्मक सार्वजनिक जीवनाचा भाग झाले आहे. अशा व्यक्ती ह्यातून मार्ग काढू शकत नाहीत. त्यांनाही संस्थेच्या उद्दिष्टांशी तसे काहीच देणे-घेणे नसते.

मुद्दा हा, खरे तर संस्थेच्या उद्दिष्टांशी जर खरोखरच कोणालाही फारसे काही देणेघेणेच उरले नसले तर अशा संस्थाच कशासाठी टिकवायच्या व संस्थात्मक जीवनाचे नेमके प्रयोजन तरी आज काय उरले आहे, याची तपासणी करण्याचा आहे.

केवळ आपणही समाजात कोणीतरी आहोत हे स्वतःला व इतरांना भासवण्यासाठी, काही आनुषंगिक लाभांसाठी, आपल्या 'बायोडाटात' एखाद्या सार्वजनिक संस्थेच्या संबंधाचा वा त्यातील पदाचा उल्लेख असावा यासाठी संस्थांशी संबंध राखणाऱ्या व तेवढ्यावरच संतुष्ट असणाऱ्यांची संख्या आज संस्थात्मक जीवनात वेगाने वाढली आहे. मात्र आपल्या अस्तित्वाने विशिष्ट संस्थेच्या उद्देशांच्या पूर्तीकडे वाटचाल केली पाहिजे व त्यासाठी साधनांचा वापर केला गेला पाहिजे, ती निर्माण केली पाहिजेत, संस्थांसाठी असणारा निधी निर्माण करून त्यात वाढ केली पाहिजे, असलेला निधी कायम न राखता तो फस्त करून संस्था चालवणाऱ्या वृत्तींचा बंदोबस्त केला पाहिजे, जी साधने आहेत त्यांचा वापर उद्दिष्टांनुरूप होतो अथवा नाही हे दक्ष राहून बघितले पाहिजे व संस्थांच्या नावांचा, प्रतिष्ठेचा व व्यासपीठाचा वापर मनःपूत पद्धतीने व अगोदरच निर्णय घेऊन, अगोदरच 'निर्मित' सहमतीच्या आधारावर घेऊन, केवळ उपचार म्हणून त्यास औपचारिक संमतीपुरते इतरांना विचारले जात असल्यास अशा अधिनायकवादी प्रवृत्तींची वाढ मुळातच रोखली पाहिजे की नाही, हा खरा प्रश्न आहे. वेळप्रसंगी प्रखर विरोधही त्यासाठी केला पाहिजे. असे करणे हे केवळ तेवढी व तीच संस्था योग्य मार्गावर राखण्यासाठी आवश्यक नसून त्या संस्थेबाहेरील सार्वजनिक जीवनात अधिनायकवादी प्रवृत्ती वाढू नयेत यासाठी-देखील हे आवश्यक आहे. याची जाण व भान असणारा वर्ग संस्थात्मक जीवनातून वेगाने एकतर नाहीसा होतो आहे अथवा त्याला हद्दपार तरी केले जात आहे. तसे करणे शक्य नाही एवढा जिथे असा वर्ग वा व्यक्ती प्रबळ आहे, तिथे उलट त्यालाच तो संस्थेच्या हिताच्या व तथाकथित 'बहुमताच्या' विरोधात जाणारा असल्याचे भासवणारी कारस्थाने रचून त्याचा निःपात तरी केला जातो आहे.

असा निःपात घडविणारे हे वर्तन त्या व्यक्तीचा निःपात घडवीत नसून केवळ अनास्थासंपन्न अशा वाढवल्या गेलेल्या सदस्या वा मतदारांच्या आधारे संस्थांच्या उद्देशांचाच निःपात अशा अधिनायकवादी प्रवृत्ती घडवून आणत आहेत.

लहानमोठ्या संस्थांचे जाळे हेच खरेतर लोकशाही राष्ट्रात व्यापक प्रमाणावर सार्वजनिक जीवन व संस्थात्मक वर्तनाचे आदर्श वा अनादर्श घालून देत असते. आज या संस्थात्मक सार्वजनिक जीवनातच संस्थांबाबत पूर्णतः उदासीन असा साधारण वा कार्यकारी मंडळ सदस्य, प्रमुख अशा एखाद-दुसऱ्या व्यक्तीचे अधिनायकत्व स्वीकारून व्यापक लोकशाही पद्धती व विचारांना स्वखुशीने सुरुंग लावणारे अनादर्श असे वर्तन मोठ्या प्रमाणावर स्वीकारतो आहे.

एकूणच संस्थात्मक वर्तन हे अशा प्रकारे लोकशाहीला पूरक वातावरण निर्माण करण्याऐवजी सामंतवादी व अधिनायकवादी अशा निर्णयप्रक्रियेसाठी पूरक भूमी व असे संस्थात्मक वातावरण निर्माण करीत आहे, असेच सर्वसाधारण चित्र आहे. याचा परिणाम संस्थात्मक जीवनाबाहेरच्या व्यापक सार्वजनिक व राजकीय जीवनात-देखील या देशाला लोकशाहीची गरज नसून अशाच एखाद-दुसऱ्या अधिनायकांचीच तेवढी गरज असल्याचे जे मत दृढ करण्याचा प्रयत्न जाणीवपूर्वक केला जातो, त्याला बळ प्राप्त करून देण्यात होतो आहे. आपल्या सार्वजनिक संस्थात्मक जीवनातील वर्तनाचा व निर्णय-प्रक्रियेचा प्रश्न हा त्यामुळे त्या त्या व्यक्तींच्या वर्तनापुरता

मर्यादित समजून दुर्लक्ष करण्याचा नसून या देशात लोकशाही वर्तन टिकवायचे आहे की अधिनायकवाद आणायचा आहे, याच्याशी संबंधित झालेला आहे. तो केवळ विशिष्ट संस्थांतर्गत संचालनापुरता मर्यादित उरलेला नाही, याचे भान व्यापक समाजहितार्थ आपल्याला असणे आवश्यक झाले आहे.

संस्थागत निर्णयप्रक्रियांवर संस्थांच्या कार्यकारी मंडळांना संस्थेच्या उद्दिष्टानुरूप आपले प्रभुत्व असण्याची इच्छाशक्तीच आज संपुष्टात आली आहे.

एका विद्यापीठाच्या एका कार्यकारी मंडळाने तर आपले सर्व प्रकारचे अधिकार एका कुलगुरूला त्यांच्या संपूर्ण कार्यकालासाठी ठराव करून बहाल केले होते. एका अखिल भारतीय स्वरूपाच्या महामंडळाच्या सभेत एका प्रख्यात पुरोगामी म्हणवणाऱ्याने तर हिशेब संमत करण्याचे त्या महामंडळाच्या कार्यकारी मंडळाचे कर्तव्य बजावण्याऐवजी ते संमत करण्याचे महामंडळाचे अधिकारच त्या महामंडळाच्या अध्यक्षांना देऊन टाकण्याचा कार्यकारी मंडळाने ठरावच करण्याचा प्रस्ताव आणला होता. काही प्रतिष्ठेचे समजले जाणारे पुरस्कार देणाऱ्या संस्थांच्या पुरस्कारांसाठी परीक्षक नेमण्यापासून तो त्यांचे प्रस्ताव आल्यावर ते आपल्या व्यक्तिगत सोयीनुसार उलट-पालट करण्याचे अधिकार हे संस्थाप्रमुखाने वर्षानुवर्षे व्यक्तिशः स्वतःकडेच घेतलेले असतात व कार्यकारी मंडळानेही ते त्याला आनंदाने दिलेले असतात. लोकांच्या वतीने कार्यकारी मंडळाला प्रदान केले गेलेले अधिकारी कसल्यातरी व्यक्तिगत प्रलोभनांच्या मोबदल्यात परस्पर-गहाण ठेवण्याचा हा व्यवसाय सार्वजनिक संस्थात्मक जीवनात सध्या अतिशय तेजीत आहे. संस्थाप्रमुख वाचतो ती पुरस्कारलाभार्थींची यादी ऐकण्याचे तेवढे काम कार्यकारी मंडळाचे सदस्य करतात. एखाद्याने त्यातील त्रुटी लक्षात आणून दिल्यावरही त्या याद्या संस्थाप्रमुख उद्दामपणे तशाच पुढे रेटतात. असे पुरस्कारार्थी ते पुरस्कार प्राप्त होण्याआधीच छातीठोकपणे आपल्यालाच तो विशिष्ट पुरस्कार मिळणार, असे सांगत फिरतात. हे सांगणारे तर आपल्याला व्यक्तिगत रीत्या ठाऊक असतात.

उदाहरणे अगणित देता येतील. पण त्याने काही साधणार नाही. आपल्या संस्थात्मक जीवनात शिरलेला अशा लोकांचा कोडगेपणा त्यामुळे यत्किंचितही दूर सरणार नाही.

राजकीय जीवनातच फौजदारी खटले दाखल होई-पर्यंतची जी वेळ आपल्या सार्वजनिक जीवनात आली आहे, तिथवरच आपले सार्वजनिक संस्थात्मक जीवन आज मर्यादित उरले नसून सांस्कृतिक संस्थात्मक जीवनातदेखील तशी पाळी येण्याइतकी प्रगती आपल्या संस्थांचे संस्थानिकीकरण करणाऱ्या वृत्ती-प्रवृत्तींनी आपल्या वर्तनाने आणून ठेवली आहे.

साहित्य-संस्कृतीच्या संस्थात्मक व्यवहारातली निर्णयप्रक्रियादेखील आज लोकशाहीच्या नावाखाली साहित्य संस्कृतीबाबतची कोणतीच दृष्टी, भान, पात्रता, योग्यता वा त्यातली जाण नसणाऱ्यांच्या हाती एकवटत चालली असून आपल्या व्यक्तिगत हितांचे रक्षण करणाऱ्या वा करण्याची शक्यता असलेल्या शासन, सत्ता, राजकारणी यांनी आखलेल्या ध्येयधोरणांना विरोध करणाऱ्या तज्ज्ञ, जाणकार व समर्पित अशा व्यक्तींच्या हाती ही निर्णय-प्रक्रिया कशी जाणार नाही याची कटकारस्थाने करण्यात व त्यात सहभागी होण्यात स्वतःला जनतेचे लेखक-विचारवंत म्हणवून घेणारेदेखील धन्यता मानत आहेत.

राज्यशासन व राजकारणी हे साहित्य-संस्कृती क्षेत्रातील संस्थात्मक यंत्रणेला, व्यासपीठांना मोठमोठ्या रकमेने अनुदानित करण्याच्या निमित्ताने त्या संस्थांवर 'शासन नियुक्त' प्रतिनिधी लादण्याच्या अवमानजनक व गैरलोकशाही पद्धतीच्या अटी लादणारे शासननिर्णय राजरोसपणे काढतात. एखाद-दुसऱ्या स्वाभिमान्याने त्याला विरोध करताच ते निर्णय फक्त स्थगित होतात. मात्र कायमचे मागे घेतले जात नाहीत, साहित्य-संस्कृती क्षेत्राच्या स्वायत्ततेला बाधा आणणाऱ्या अवमानजनक अटींना विरोध करणाऱ्यांचा विरोध हा संस्थात्मक नसून तो 'व्यक्तिगत' आहे, संस्थेचा त्याच्याशी काहीही संबंध नाही असे तथाकथित अधिकृत व लाचार खुलासे साहित्य-संस्कृती क्षेत्रातील संस्थांकडून केले जातात व ते करणाऱ्यांना कोणताही जाब विचारण्याची संस्थांमधील कार्यकारी मंडळ अथवा व्यापक अशा साहित्य संस्कृती विश्वाला, लेखक-कलावंत-विचारवंतांनादेखील गरज वाटत नाही. हे तथाकथित मुख्यप्रवाही साहित्य संस्थात्मक








व्यवहाराचे आजचे चित्र आहे.

स्वायत्ततेचा वा आदर्श संस्थात्मक व्यवहाराचा पुरस्कार करणाऱ्या व त्यापोटी अवांछित संस्थात्मक व्यवहाराला आळा घालण्याकरिता विरोध करणाऱ्यांच्या विरोधाची दखल घेण्याऐवजी तार्किक दृष्ट्या त्याची उत्तरे देण्याऐवजी, वस्तुस्थितीचे निवेदन करण्याऐवजी, दिशाभूल करणारी निवेदने करून अशा व्यक्तींनाच मोडून, खोडून काढण्याची, अशा विरोधकांना व्यक्तिगत शत्रू समजून अशा व्यक्तींना एकटे पाडून गारद करण्याच्या युक्त्या-प्रयत्नांची संस्थात्मक संस्कृती उदयाला आणली गेली आहे.

सारा संस्थात्मक व्यवहार हा शासनसत्तेच्या नियंत्रणाखाली आणण्याच्या अथवा आपल्याच तेवढ्या कलेने नियंत्रित करण्याच्या मार्गाने हे सारे चालले आहे. त्याबाबत खुद्द लेखक-कलावंतही मूग गिळून आहेत.

हे सारे भयानक, भयावह, गैरलोकशाही व अधिनायकवादाला शांतपणे समर्थन देणेच आहे. संवेदना जागवायच्या तर अशा संस्थानिकी करणाऱ्या अधिनायकवादी वृत्ती-प्रवृत्तींच्या विरोधात सांस्कृतिक संस्थात्मक स्वायत्ततेचा उठाव करणे आवश्यकच आहे. मात्र असा उठाव करणाऱ्यांना हितसंबंधीयांकडून 'लोकशत्रू' ठरविण्याची मोहीमही चालविली जाणारच. या वास्तवाचा सामना करणे ही आजची खरी संस्थात्मक गरज आहे. सारे संस्थात्मक सामाजिक जीवन, जीवनाची सारी क्षेत्रे तळापासून ढवळून निघत असताना ही सारी ढवळाढवळ आपल्या साहित्य-संस्कृतीचा भाग का व कसा होत नाही? चर्चा, युक्तिवाद, तर्क, कायदे, नियम व त्या आधारे सहमती निर्माण करून संस्थात्मक व्यवहार चालविण्याची संस्कृती वेगाने लोप पावत गेली असून त्याची जागा व्यक्तिगत स्वरूपाच्या छोट्यामोठ्या लाभाच्या, मोहाच्या आमिषांच्या आधारावर गट करून त्यांचे 'बहुमत' करून घटनात्मक नैतिकतेला दूर सारून त्यावरच सर्व सहमती निर्माण केली जाते आहे.

अस्तित्वात असणाऱ्या अनेक ख्यातनाम सार्वजनिक संस्थाच्या निर्मितीच्या त्यांच्याच घटनांमध्ये वर्णित उद्दिष्टांच्या आधारे, त्यांची किती परिपूर्ती या संस्थांनी त्यांच्या अस्तित्वाच्या पन्नास-पाऊणशे-शंभर वर्षांत केली याचे व्यवस्थित सर्वेक्षण करण्याचा उपक्रम सामाजिक कार्य महाविद्यालयांच्या प्रकल्प व संशोधनासाठी हाती घेतला जावा. तो खरोखरचा तसा घेतला गेला तर त्यातून प्राप्त होणारे निष्कर्ष असे सांगतील, की वर्षानुवर्षे अस्तित्वात असणाऱ्या या संस्थांनी त्यांच्या उद्देशांपैकी आत्यंतिक महत्त्वाच्या उद्दिष्टांना स्पर्शसुद्धा केलेला नाही. तरीही वर्षानुवर्षे जनतेचा पैसा आणि शासनाची अनुदाने यांवर त्यांची गुजराण चालूच आहे.

या साऱ्याची वाच्यताच न करण्याचा परस्परांचा जो अलिखित करार झालेला आहे, तो जोवर मोडला जात नाही तोवर सारे काही आलबेल असलेले दिसते.

केवळ कळसावर आरूढ राजकारण्यांच्या, राजसत्तेच्या व त्यातल्याही उच्चपदस्थांच्या 'आर्थिक' भ्रष्टाचाराविरुद्ध हातात मेणबत्त्या घेऊन जमाव केल्याने अथवा त्याविरुद्ध मोठे मोठे तिरंगे दूरचित्रवाणीचा कॅमेरा त्यावर आहे तोवरच जोमाने फडकावल्याने राष्ट्रभक्तीची सिद्धता आणि भ्रष्टाचाराचे निर्मूलन करू बघणाऱ्या आंदोलन व चळवळींसमोर खरे आव्हान हे लोकशाही वर्तनाला संस्थोसंस्थी रोजच असे सुरुंग लावून ते उद्ध्वस्त करीत चाललेल्या तळपातळीवरील संस्थात्मक व्यवहाराचे, संस्थानिकीकरणाच्या वृत्तीचे, व्यक्तिगत लोभापोटी स्वाभिमान व स्वत्वासह सारे काही गहाण टाकण्यास तयार असणाऱ्या वृत्ती-प्रवृत्तींच्या गेरलोकशाही वर्तनाचे आहे.

हे आव्हान स्वीकारायचे तर केवळ एकमेकांना टोप्या घालून तेवढे हे होणार नाही. संस्थोसंस्थी असंख्य अण्णा हजाऱ्यांची गरज पडणार आहे. 'तुम्ही अण्णा हजारे व्हा', 'आम्ही तुमच्या पाठीशी आहोत' असे म्हणणारे मानभावी संस्थासेवक प्रस्तुत लेखकाला अनेक भेटतात. अनेक तयार होतील. पण मीच तो होतो, तुम्ही मला साथ द्या म्हणायला ते पुढे होणार नाहीत. खुद्द अण्णा हजारेदेखील हा व असा तळपातळीवरील प्रश्न हाती घ्यायला राजी होण्याची शक्यता नाही. कारण ते काम कुठल्याही 'मीडिया-फोकस' शिवाय नित्यनेमाने, दैनंदिन संघर्षरत राहून करायचे कार्य आहे. जमावाने ते होणारे नाही, त्यासाठी शेकडोंनी हाती मेणबत्त्या घ्यायला वा तिरंगे फडकावयला कोणी तयारही होण्याची शक्यता नाही.

दिल्ली, मुंबई अथवा इतरत्रचे कळसावरील राज-कारणी व उच्चपदस्थ यांच्या भ्रष्टाचारावर लक्ष केंद्रित करण्याच्या आंदोलनाला लाभणाऱ्या व्यापक प्रसिद्धी वा पाठिंब्याची इथे सुतराम शक्यता नाही. कारण हे क्षेत्र काही 'कार्पोरेट' हिताचे नाही व तसे ते होणेही इष्ट नाही. तरीही अधिनायकवाद टाळायचा व लोकशाही टिकवायची गरज आहे व म्हणून तर ती तळपातळीवरील सर्व प्रकारच्या संस्थात्मक जीवनातले सर्वच प्रकारचे गैरवर्तन, नियमबाह्य घटनाबाह्य वर्तन, घटनात्मक नैतिक-कतेचा दुसऱ्याविरुद्ध शस्त्र म्हणून तेवढा सोईनुसार व सोईपुरता वापर करणारे व स्वतः मात्र त्याचा सतत दुरुपयोग, उपमर्द व अधिक्षेप करणाऱ्या संस्थात्मक गैरवर्तनाविरुद्ध, संस्थानिकीकरणाच्या या वृत्ती-प्रवृत्तीविरुद्ध ज्याचे त्यालाच उभे रहावे लागेल.

त्यासाठी क्षुल्लक स्वरूपाचे व्यक्तिगत लाभ, पद-लालसा, प्रतिष्ठेच्या खोट्या संकल्पना, शासकीय समित्या, मान-मरातब, पुरस्कार, दान, अनुदान, देशी-परदेशी वाऱ्या या व अशा व्यक्तिगत लाभांच्या, मोहांच्या त्यागाची मानसिकता अंगी बाळगावी लागेल आणि सरतेशेवटी अंगी बाळगावे लागेल ते नैतिक धैर्य आणि आत्मिक बळ. कबीराचे एक वचन आहे, 'जिसे कछु नही चाहिए, वही शहेनशहा.' त्याचा अर्थ समजूनच घ्यावा लागेल.

सरतेशेवटी पर्याय तीनच आहेत. पहिला पर्याय सर्वाधिक सोपा आहे, तो म्हणजे आहे त्या परिस्थितीला पूर्णपणे शरण जाऊन आपणही संस्थानिकीकरणाच्या वृत्ती-प्रवृत्ती अंगी बाणवणे आणि अशा चर्चाच निरर्थक ठरवणे, जो तूर्तास स्वीकारलाच गेला आहे. मात्र तसे करायचे नसेल तरच पुढच्या दोन पर्यायांकडे वळावे लागेल. दुसरा पर्याय आपणही स्वतःच या स्वरूपाचा ज्या अवस्थेचा भाग आहोत, तिथेच आपआपल्यापुरती तरी जागा स्वच्छ करून घेण्याचा प्रयत्न सतत करीत या वृत्ती-प्रवृत्तींना शक्य त्या प्रमाणात शक्य तेवढा विरोध प्रामाणिकपणे, व्यक्तिनिरपेक्ष रीत्या करीत राहणे. मात्र त्याच्या मोबदल्यात आपण एकाकी पाडले जाणे, आपला छळ होणे, आपल्या विरुद्ध खोटेनाटे आरोप केले जाणे, आपल्या व्यक्तिगत आनुषंगिक लाभांवर पाणी सोडावे लागणे हे सारे त्यासाठी स्वीकारावे लागेल. आणि तिसारा पर्याय आदर्श संस्थात्मक जीवनाच्या, पारदर्शित्वाच्या कर्तृत्वशून्य गप्पा तेवढ्या मारण्याऐवजी नव्या दृष्टीच्या तशा पर्यायी नव्या संस्थात्मक रचना, संरचना उभारण्याचे कार्य प्रत्यक्षात हाती घेणे. प्रवाहपतित व स्वार्थी नेतृत्वाविरुद्ध तरुणांनाही उभे राहून संस्थात्मक जीवन आपल्या हाती घ्यावे लागेल. बदल हवा असेल तर केवळ एकमेकांवर दोषारोपण करून आणि दोषा-रोपणाचे राजकारण तेवढे कुशलपणे हाताळून व आपल्या बाजूने कुस्ती तेवढी निकालात काढून दाखवल्याने चालणार नाही. निराश व हतबल होऊन तर मुळीच चालणार नाही. कारण तसे व्हावे, तरुणांची, बदल घडवणाऱ्यांची दमछाक व्हावी व कंटाळून त्यांनी संस्थात्मक जीवनात रस घेणे बंद करावे, हे तर संस्थानिकीकरणाच्या वृत्ती-प्रवृत्तींचे धोरणच असते.

जी माणसे त्यांच्या ताटाखालची मांजरे होण्यास तयार नसतील; त्यांचा हरप्रकारे छळ करून, त्यांचे खोट्या-नाट्या पद्धतीने प्रतिमाहनन करण्याची मोहीम अशा प्रवृत्ती अखंडपणे चालवीतच असतात. तोच त्यांचा मुख्य उद्योग असतो, संस्थात्मक जीवनात पायाभूत बदल घडवू इच्छिणाऱ्यांच्या वाट्याला प्रवाहपतित, स्वार्थी व भ्रष्ट नेतृत्वाकडून उपेक्षा, एकाकीपण, अशांच्या विरुद्ध ते संस्थात्मक संस्थागत पदावर असतील तर पदांवरून अशा मंडळींना हुसकावून लावणारी, त्यासाठी धम-कावणारी कट-कारस्थाने करून, षडयंत्रे रचून, एकांगी, एकतर्फी, दिशाभूल करणारा प्रचार त्यांच्याविरुद्ध करून, हरप्रकारे असा बदल घडवू इच्छिणाऱ्यांचा छळ संभवणे ही अपरिहार्य नियतीच राहणार. ते भोगही अपरिहार्यपणे भोगावेच लागतील.

फक्त आपण अपेक्षित बदल घडवू शकतो, यावर ठाम विश्वास तेवढा असावा लागेल. तेवढ्यानेच चालणार नाही; तर असा विश्वास बाळगणाऱ्यांना आपले नैतिक आणि आत्मिक बळ हीच आपली खरी साधनसामग्री आहे हे जाणून घेऊन ती मात्र सतत आपल्या आत जागृत ठेवावी लागेल.

हे भान बाळगले जाणे हे आज संस्थात्मक सार्वजनिक जीवनातील आद्य नागरिक कर्तव्य ठरत असून ते पार पाडणारे हे आदर्श नागरिक ठरविले

अनुक्रमणिका

जातील व असे वातावरण मोठ्या प्रमाणावर निर्माण केले जावे, याचा प्रयत्न करण्याची गरज आहे. तरच या देशातील लोकशाही सुरक्षित राहू शकेल अन्यथा आपल्या अभिव्यक्तिस्वातंत्र्याचा आपणच स्वखुशीने बळी घेऊन आपण वेगाने अधिनायकवादी समाजात रूपांतरित होण्याकडे वाटचाल करू लागलो आहोतच.

☆☆☆

टीप : विदर्भ सांस्कृतिक आघाडी या संस्थेने दि. २३ डिसेंबर २०११ रोजी एक परिषद आयोजित केली होती. तेथे श्रीपाद भालचंद्र जोशी यांनी दिलेले बीज भाषण इथे लेख रूपाने प्रसिद्ध करत आहोत.

# दंडनीयता आणि क्षमाशीलता

श्री. बाबूराव चंदावार

## प्रास्ताविक

गुन्ह्याला अथवा अपराधाला क्षमा नसावी, असा सर्वसामान्य समज सर्वत्रच झालेला आहे. यातून नेमके कशाला गुन्हा वा अपराध म्हणायचे असते व त्याला कोणता दंड देणे सयुक्तिक मानले जाईल, हे तसे स्पष्ट होतच नाही! कारण, गुन्हा वा अपराध ही एक मानसिक प्रतिक्रियाच असते व आहे. म्हणून, ती सत्याचा शोध घेण्यास सक्षम नसते व नाही. तेव्हा, प्रतिक्रियेतून जे काही वाटते, ते सत्याची चाड असणारेच असते किंवा काय, हे उलगडायला हवे आहे. अर्थात, हे आजवर उलगडलेलेच नाही. म्हणून, जे उलगडलेलेच नाही त्या आधारे कोणालाही दंडित करणे अथवा शिक्षा देणे न्यायसंगत असते, असे म्हणता येत नाही व म्हणूही नये! पण, म्हणूनच जे दंडविधान निर्माण केले गेले आहे, ते न्यायस्थापनेसाठीच निर्माण केले गेले आहे असे जेव्हा म्हटले जाते, तेव्हा त्यात न्यायस्थापनेची संकल्पना ही निव्वळ मानसिक पातळीवरची असल्यामुळे, ज्यांची जशी मनाची घडण झालेली आहे व ती घडत ठेवली गेलीही असेल, तशीच ती घडत आलेली आहे व ती घडत ठेवली गेलेलीही आहे. पण, अशी ही मनाची घडण न्यायसंकल्पनेचा स्वीकार करण्यास योगय असते किंवा काय, हे मात्र स्पष्ट होत नाही! कारण, मन चंचल असते व ते तसेच असू शकते! म्हणून, मन अस्थिर होत जाते. मनाची चंचलता व त्यातून येणारी अस्थिरता या दोन्ही अशा एका आकर्षणातली म्हणता येतील की जी मनाला सतत चंचल व अस्थिर करीत राहील. म्हणून, हे मनाचे आकर्षण सत्याच्या मार्गावरचेच आहे, याची खात्री कोणालाच देता येत नाही व आजवर कोणालाही ती देता आलेली नाही. तेव्हा, मनाच्या चंचल अवस्थेकडे व त्यातून येणाऱ्या अस्थिरतेकडे जसं पाहिले जाईल, तसेच न्याय या संकल्पनेचे स्वरूप घडतही जाईल. म्हणून, सत्याच्या मार्गाने जाऊनच खऱ्या अर्थाने न्यायाचे आकलन करून घेण्यासाठी मनाची अवस्था साधक, उपकारक व मुक्तिदायी असावी लागते. ती अवस्था अशी नसेलच, तर मनाच्या प्रतिक्रियेतून निपजणारी कोणतीही घटना अपराधातली वा गुन्ह्यातलीच असावी, असे मानले गेले तर त्या मानण्यापुढे प्रश्न निर्माण होतो व तो अनुत्तरितच राहून जातो! आजवर तो अनुत्तरितच राहिलेला आहे. कारण, गुन्ह्याचे वा अपराधाचे निवारण करण्यासाठी जी दंडनीती निर्मिली व अनुसरली गेली, ती अशा अनुत्तरित प्रश्नातलीच असल्यामुळे कोणत्याच अवस्थेत कोणालाही ती मुक्तिदायी ठरत नाही, ठरलेली नाही व ठरणारही नाही, हे स्पष्टच आहे!

तेव्हा, गुन्ह्याला वा अपराधाला दंडनीय मानण्याचा निश्चित असा निकष असावयाला हवा. तो नेमका काय असावा, हे निश्चित न करताच जर दंडनीयतेचे प्रयोजन मानले गेले जात असेल किंवा मानले गेलेच असेल, तर ती एक अमानवीयताच म्हणायला हवी! म्हणून, दंडनीयतेला मानवीयतेचा पाया असावयाला हवा. अर्थात, दंडनीयता पायाशुद्ध नसेल तर दंडविधानातून जे अनेक प्रकारचे कायदे निर्माण केले गेले आहेत व त्यांचा उपयोग केला जातो आहे, ते सर्व अमानवीयच ठरतात व ठरलेही आहेत. या दृष्टीने सध्याच्या काळात किंवा या आधीच्या काळातही राज्य करण्याच्या संस्कारात व त्यातून निपजलेल्या प्रवृत्तीतून ज्या दंडनीयतेचा स्वीकार केला गेला व अद्याप केला जातो आहे, तो न्यायाच्या भूमिकेतला आहे किंवा अन्य भूमिकेतला आहे, हे जाणून घेणे गरजेचे आहे. कारण, न्यायाची ही भूमिका जे वठवतात व त्यासाठी दंडनीयतेला स्वीकारतात, ते जर स्वामित्व जपणारे किंवा स्वामित्वातूनच स्वतःचे वर्चस्व निर्माण करू इच्छिणारे असतील, तर त्यांच्या कृत्यातून ते समाजधारणा निर्माण करणारेच असतील किंवा काय, हे पडताळून घ्यायला हवे! कदाचित हे पडताळून घेतलेच जात नसावे.






म्हणून, न्यायाच्या भूमिकेतली मानूनच जी दंडनीयता स्वीकारली गेली आहे, ती सामाजिक जाणिवेला पुष्ट करणारी किंवा सामाजिक जाणिवेचे मूल्य स्वीकारणारी नसू शकेल किंवा नसावीच, असेही सिद्ध होऊ शकेल! या दृष्टीने विचार करता लक्षात येईल की, न्यायासाठी जी दंडनीयता स्वीकारली गेली आहे किंवा स्वीकारली जाते आहे, तिचे सामाजिक धारणानिर्मितीच्या दृष्टीने प्रयोजन आहे किंवा काय, हे स्पष्ट करून घ्यायला हवे आहे. पण, हे स्पष्ट करून घेणे शक्य होत नाही व ते शक्य होईल असे वाटतही नाही. कारण, या दृष्टीने जे अडथळे निर्माण होतात किंवा झालेले आहेत, ते सर्वच मानवीय दृष्टीतले नसावेत किंवा नाहीतच अशा एका निष्कर्षाप्रत जाण्यास ते भाग पाडणारेच म्हणताही येईल!

**१. दंडनीयतेचा पाया :**

मनाची चंचलता मनाला होणाऱ्या आकर्षणातलीच असते व म्हणून ती अस्थिरच राहू शकते. कारण, चंचलतेतूनच अस्थिरता येत असते. तेव्हा, मनाची चंचलता किंवा अस्थिरता ज्या आकर्षणातून येते, ती उपभोगाच्या वृत्तीची जोपासना करणारीच असू शकते व आहे. कारण, मनाचे आकर्षण उपभोगात केन्द्रित होत जाते, तेव्हा त्यातून जी मनाची अवस्था होत असते त्यातूनच स्वामित्वाचा अंकुर फुटत असतो व तो वाढत जाऊन स्वामित्वाच्या विशाल वृक्षाएवढा तो होत असतो. वृक्ष वठला की तो स्वतःचे अस्तित्व जाणवत ठेवण्यासाठी स्वतःची लीला (प्रभाव) निर्माण करतो. याच पद्धतीने स्वामित्वाचा अंकुर फुटल्यावर तो स्वामित्वभावनेला वाढवीतच स्वतःची लीला (प्रभाव) दाखवत सुसाटत असतो. ही लीलाच स्वामित्व गाजविणारी असते व ती दुसऱ्यावर राज्य करण्याच्या इच्छा-आकांक्षेच्या रूपातच प्रस्तुत होत असते! यातून राज्यकर्ते निर्माण होतात. अर्थात, स्वामित्वाच्या भावनेतूनच राज्यकर्ते निर्माण होतात व त्यांच्या इच्छा-आकांक्षेतूनच राज्यविधान अस्तित्वात आणले जाते. अशा तऱ्हेने स्वामित्व व त्याची धारणा ही सामाजिकतेहून निव्वळ वेगळी व स्वतंत्र धारणाच असू शकते व आहे. अर्थात, ती सामाजिक धारणा नसते व नसूच शकते! तेव्हा, स्पष्ट आहे, की स्वामित्वाची धारणा व सामाजिक धारणा या दोन्ही वेगवेगळ्या व स्वतंत्र आहेत. पण, सामाजिक धारणेसाठीच राज्य-विधानातल्या धारणेचे प्रयोजन असते व त्याची गरजही असते, असे मानूनच राज्याचे 'संविधान' (राज्यघटना) व त्यातून निर्माण झालेली राजकीय व्यवस्था अस्तित्वात आणली गेली आहे. पण, राजकीय व्यवस्थेची धारणा व सामाजिक धारणा यांत कुठेही तत्त्वतः व व्यवहारातही कोणत्याही काळी व कसाही मेळ बसवताच येत नाही. कारण, ते शक्यच नसते व नाही. याची दखल घेतली जात नाही व ती घेतली जाऊही नये, अशीच एक मानसिकता राजकीय व्यवस्थेतून घडवली गेली व घडवली जाते आहे! यातूनच राजकीय व्यवस्थेचे वर्चस्व लोक-जीवनावर लादले जाते व ती खंडित होता कामा नये जेणेकरून जनमानसातून तिला अस्वीकृत वा बहिष्कृत करण्याची शक्यताच असू नये, याची काळजी घेतलीच जाते. यालाच कायदा आणि सुव्यवस्था (लॉ ॲण्ड ऑर्डर) म्हटले गेले आहे. तेव्हा, कायदा आणि सुव्यवस्थेच्या परिपालनातून राज्यव्यवस्थेला स्थिरता देऊनच सामाजिक धारणेची वस्तुस्थिती निर्माण होण्याची संधी नाकारली जाते! अशा नाकारण्यातूनच राजकीय व्यवस्थेतल्या स्वामित्वाचे मूल्य लोकजीवनात रुजवण्याचा आग्रह धरला जातो व हा आग्रहच दंडविधानात व दंडनीयतेत परिवर्तित होत असतो. म्हणून, दंडनीयता राजकीय व्यवस्थेतल्या स्वामित्वाचे मूल्य लोकमानसात रुजवूनच अस्तित्वात ठेवली जाते. अर्थात, याला राज्याच्या दंडविधानाचा पाया लाभलेला असतो. अशा तऱ्हेने दंडविधान व दंडनीयतेचा पाया रचला जातो व रचला गेला आहे!

**२. दंडनीयतेला मानवीयतेचा पर्याय :**

राजकीय व्यवस्थेत दंडविधानातूनच दंडनीयता जगात सर्वत्रच स्वीकारली गेली असल्यामुळे न्यायाची संकल्पना केवळ राज्यव्यवस्था चालविण्याच्या हेतूनेच स्वीकारली गेली आहे. यामुळे ती राज्याला अभिप्रेत असलेल्या न्यायाच्या अर्थानेच जगात सर्वत्र स्थिर केली जाते व स्थिर केली गेलीही आहे. पण, यामुळे न्यायाची संकल्पना सामाजिक धारणेतली नसणेच स्वाभाविक झालेले आहे! म्हणून, न्याय म्हणजे राज्याचा न्याय एवढाच एकतर्फी न्याय अस्तित्वात असून या न्यायासाठीच दंडविधान व दंडनीयता या दोन्ही कायम केल्या गेल्या आहेत. यामुळेच

राज्याचा न्याय व सामाजिक न्याय या दोन स्वतंत्र जाणिवेतल्या स्वतंत्र संकल्पना ठरतात व म्हणूनच या दोहोंचा मेळ बसवता येणे शक्य नसते व नाही. तेव्हा, दंडविधान व दंडनीयता या दोन्ही राज्याकांक्षा बाळगणाच्या मूळ प्रवृत्तीतल्याच असल्यामुळे दंडविधान व दंडनीयता सामाजिक न्यायाच्या संदर्भात निरर्थक व त्याज्य ठरतात व ठरलेल्याही आहेत. म्हणून, सामाजिक गरज लक्षात घेऊनच सामाजिक धारणेतली न्यायाची संकल्पना असावी काय, ती तशी असू शकते किंवा काय, याचा विचार करायला हवा. हा विचार करणे माणसांना व त्यांच्या समूहांना सामाजिकता प्राप्त व्हावी याच एका उद्देशाने नितांत गरजेचे झालेले आहे! अर्थात, याकडे दुर्लक्ष केल्यामुळे माणसांची व मनुष्यसमूहांची सामाजिकता साकारली जाणार नाही, व अंतिमतः माणसांना व त्यांच्या समूहांना प्राण्यांच्या कळपाचेच रूप प्राप्त होईल! सध्या जगात हेच घडते आहे काय?

राज्याच्या न्यायानुसार अपराधी वा गुन्हेगार ठरवल्या गेलेल्यांना दंडित केले जाते. पण, राज्यकर्ते जे कायदे घडवतात ते लोकहित लक्षात घेऊनच घडवतात, याची खात्री मात्र देता येत नाही. कारण, कायदे घडवण्यासाठी जी कार्यपद्धती अनुसरली जाते, ती वस्तुतः लोकसंमतीतून निर्माण केलेली नसते व नाही. म्हणून, राज्याचे कायदे मुळातच लोकसंमतीतले नसतात. राज्यकर्त्यांच्या संमतीतले व त्यांना अनुकूल असेच ते असू शकतात व असतात. पण, लोकशाहीत बहुमत हाच एक निकष मानून राज्यकर्ते आपल्या सोयीने बहुमत प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करतात व त्यात त्यांना यशही मिळतच असते! संसदीय लोकशाहीत हा ते त्यांचा आदर्श मानूनही घेतात. पण, बहुमत हे अनेक मार्गांनी, बहुधा गैर मार्गांनीच मिळवता येऊ शकते. तेव्हा, गैरमार्गातून मिळवलेल्या बहुमतातून जे लोकप्रतिनिधी निवडले जातात व त्यातून राज्यकर्ते अस्तित्वात येतात, ते सामाजिक न्यायाची चाड बाळगणारे नसणेच स्वाभाविक असते. कारण, राज्यकर्त्यांच्या स्वामित्वभावनेतून जी वृत्ती बनत जाते, ती सामाजिक जाणिवेतली मुळातच नसते. म्हणून, बहुमताचा निकष हा लोकांवर राज्य करण्याच्या हेतूतलाच असू शकतो व असतो. या निकषाला सामाजिकता स्पर्शून जातच नाही. अशा स्थितीत घडणारे दंडविधान व दंडनीयता या दोन्ही राज्यकर्त्यांच्या स्थैर्यासाठी व त्यांच्या रक्षणासाठीच असतात. म्हणून या दोहोंना सामाजिकतेशी कर्तव्यच नसते व नाही. हीच जर वस्तुस्थिती असेल व आहे, तर मग दंडविधान व दंडनीयता सामाजिक न्यायातली असणेच शक्य नसते, हे स्पष्टच आहे. म्हणून, दंडविधानातून ज्यांना दंडित केले जाते, ते अर्थातच सामाजिक भावभावनेतले नसते. याचा सरळ अर्थ असा, की दंडविधान व दंडनीयता या दोहोंना लोकांचे शोषण करण्याचेच साधन राज्यकर्ते करून घेत आलेले आहेत. या दृष्टीने विचार करता लक्षात येते, की दंडविधान व दंडनीयता या दोन्ही राज्यकर्त्यांच्या स्थैर्य व संरक्षणासाठी लोकांचे शोषण करीत राहण्याचीच प्रमुख साधने आहेत व ते अबाधित ठेवण्यासाठीच राज्यकर्ते दक्ष असतात व आहेत. यातूनच शोषणप्रक्रिया अबाधित ठेवली जाते. राज्यसंस्था जनकल्याणकारी असते, असे जरी म्हटले जाते, तरी राज्याकरवीच लोकांचे शोषण होत असते, असे जे क्रांतीच्या संदर्भात म्हटले गेले आहे, ते अर्थातच लक्षात घेण्यासारखे आहे. म्हणून, शोषणमुक्तीसाठी क्रांतीची अपरिहार्यता प्रतिपादिली जाते. याकडे दुर्लक्ष करायचे नसते व दुर्लक्ष करूही नये! तेव्हा, दंडविधान व दंडनीयता या दोन्ही शोषणप्रक्रिया चालवणाऱ्याच असतात, हे लक्षात घेऊनच दंडविधानाला व दंडनीयतेला पर्याय शोधायला हवा व तो मानवीय भूमिकेचा पुरस्कार करणाराच असावयाला हवा!

### ३. क्रांती व भ्रांती :

पर्यायाचा विचार केला जातो, तेव्हा 'क्रांती'चे प्रयोजन व उपयुक्तता या दोन्हींचा पुरस्कार केला जातो. पण, क्रांतीच्या अर्थाविषयी अद्याप तरी बरीचशी संदिग्धता कायम आहे. कारण, क्रांतीचा कोणताही एकच निश्चित अर्थ केला जाणे अद्याप शक्य झालेले नाही. अर्थात, क्रांतीला परिवर्तन अपेक्षित आहे व क्रांतीतून परिवर्तन होत असते, हेदेखील स्पष्टच आहे. पण, जे परिवर्तन घडून येते ते क्रांतीच्या उद्दिष्टांना अनुसरूनच असते किंवा काय, याचा उलगडा मात्र होत नसतो व होतही नाही. कारण क्रांतीतून ज्या ठिकाणी परिवर्तन आले वा आणले गेले, असे मानले जाते, त्या ठिकाणी सामाजिक

धारणा निर्माण झाली व ती सामाजिक न्यायस्थापनेसाठी प्रयोजनकारी व उपयुक्त ठरली, याचे दर्शन होत नाही व झालेलेही नाही. म्हणून, कशालाही क्रांती म्हणून चालत नाही. क्रांतीचा अर्थ जरी परिवर्तन मानला जात असला व मानला जातो, तरी कोणतेही परिवर्तन क्रांतीतलेच असते व असू शकते, असे मात्र प्रत्यक्षात दिसून आले नाही व दिसून येतही नाही. कारण, क्रांतिनंतरच्या परि-वर्तनातूनही शोषणाची मूल्ये वेगळ्या स्वरूपात शिल्लक उरतात, असेच दिसून आले आहे! म्हणून, क्रांतीला निव्वळ परिवर्तनच अपेक्षित नाही, 'मूल्यपरिवर्तन' (चेंज ऑफ व्हॅल्यूज) अपेक्षित आहे. अर्थात, मूल्यपरिवर्तन म्हणजे क्रांती, असा याचा अर्थ होतो व या अर्थानुसार जगात ज्या राष्ट्रांमधून क्रांत्या झाल्या, असे म्हटले गेले, त्या राष्ट्रांतूनच शोषणाची मूल्ये वेगळ्या स्वरूपात कायमच राहिलेली असून त्या ठिकाणी मूल्यपरिवर्तन साधले गेलेच नसल्याचे स्पष्ट झाले आहे! पण, क्रांतीच्या प्रक्रियेत शोषणाच्या परिस्थितीत बदल घडवून आणणे शक्य होत असते. म्हणूनच निरंतरेत प्रक्रिया चालवीत राहावी लागते व ते अपरिहार्य असते, असे म्हटलेही जाते. जयप्रकाश नारायण यांनी 'क्रांतीची निरंतरता' हा शब्दप्रयोग केला, तो लक्षात घेण्यासारखा आहे. हे जरी मान्य केले, तरी कोणत्याही प्रक्रियेतून शोषणाला संधी उपलब्ध होता कामा नये, याची काळजी तर घ्यावीच लागते! पण, ही काळजी जेव्हा घेतली जात नाही, तेव्हा त्यातून एकाधि-कारशाहीचा किंवा हुकूमशाहीचा प्रादुर्भाव होत असतो व झालाही आहे. म्हणून, भांडवलशाहीतली शोषणाची परिस्थिती व हुकूमशाहीतली शोषणाची परिस्थिती या दोहोंत जरी फरक आहे, तरी या दोहोंतून शेवटी निष्कर्ष हा शोषणविहीन अवस्थेचा निघत नसतो, हेच स्पष्ट होत असते. म्हणून, शोषणमुक्तीसाठी जरी क्रांती अपरिहार्य ठरते, तरी क्रांतीतून शोषणमुक्तीची वस्तुस्थिती निर्माण होणारच नसेल किंवा निर्माण झालेलीच नसेल, तर क्रांती ही एक भ्रांतीच ठरून जाते जगात ज्या राष्ट्रांतून क्रांती घडून आली आहे असे म्हटले जाते, त्यांतून हेच प्रत्ययास आलेले आहे! म्हणून, 'क्रांती' ही 'भ्रांती' ठरू नये या दृष्टीनेच विचार करणे गरजेचे असते, ही गरजपूर्ती कशी करता येईल, हा या बाबतीतला प्रमुख व यक्षप्रश्न आहे व तो अद्याप तरी अनुत्तरितच राहिलेला आहे!

**४. क्रांतीची पारंपरिक प्रामाण्यता :**

ज्याला अपराध अथवा गुन्हा म्हटले जाते त्याची निर्मिती कशी होते, याचा शोध घेता आल्यास आणि याची वस्तुस्थिती लक्षात येऊ शकल्यास 'क्रांती' आणि 'भ्रांती' या दोहोंमधला फरक लक्षात येणे शक्य होऊ शकेल. अर्थात, या बाबतीत खात्रीपूर्वक लगेचच काहीही सांगता येण्यासारखे नसते व नाही. पण, फरक लक्षात घेण्याच्या मार्गावर निश्चितच जाता येऊ शकेल एवढे मात्र वाटते!

कालपरत्वे अपराध अथवा गुन्ह्याचे स्वरूप घडत गेलेले आहे. म्हणजे ज्या एका काळात ज्याला गुन्हा अथवा अपराध म्हटले गेले आहे, त्यालाच बदलत्या काळात गुन्हा अथवा अपराध म्हटले गेलेले नसणेच संभवले आहे. कारण, गुन्हा वा अपराधाची मान्यता समजुतीतून बदलत गेलेली म्हणजे ती समजुतीतून येत-जात राहिलेली आहे. ज्या काळात वर्णाश्रमव्यवस्थेत अस्पृश्यता मान्यता पावलेली होती तो काळ बदलल्यावर ती अस्पृश्यता अमान्य केली गेली आहे. म्हणजे मान्यतेचे एकच एक स्थायी रूप असणे शक्य नसते व नाही. कालपरत्वे माणसाला समज येत असते व ती विकसित होत गेली की मान्यता बदलत जाते. तेव्हा, माणसाच्या वाढत्या समजशक्तीवर मान्यतेचे रूप पालटत असते व यातूनच मान्यतेची नवनवी घडण होत असते! यानुसार गुन्ह्यांची वा अपराधांची व्याख्याही पालटत गेली आहे, यापुढेही पालटतच राहणार आहे. कारण, माणसाची समजशक्ती विकसित होत जाण्याच्या वाढत्या क्रमातूनच हा बदल होत असतो. शोषणमुक्तीसाठी क्रांती अपरिहार्य मानली गेली असल्यामुळे क्रांतीत माणसाची समजशक्ती विकसित होत जाणे गरजेचे असते व आहे. पण, म्हणूनच क्रांतीच्या अर्थाविषयी व आशयाविषयीही पूर्वीहून अधिक प्रमाणात स्पष्टता येणे वा ती आणली जाणेही गरजेचे असते! अर्थात, या बाबतीत प्रामाण्यतेचा प्रश्न उपस्थित केला जातो व क्रांतीच्या प्रामाण्यावर, यात ग्रंथप्रामाण्यही आहेच, अवलंबून राहूनच क्रांतीचा अर्थ लावला जातो. यामुळे क्रांतीची एक परंपरावादी मान्यता अस्तित्वात आणली गेली असून, तिच्या आधारेच दंडविधान व

दंडनीयतेला आश्रय देऊन तिचे संरक्षण केले जाते आहे. यातून क्रांतीची संकल्पना व तिची प्रयोजनकारिता व उपयुक्तता या दोन्ही कालानुरूप राहूच शकत नाहीत. यामुळे क्रांतीच्या विचारविकासात बाधा निर्माण होत असते व झालीही आहे. म्हणून, 'क्रांतीमध्ये हिंसा अपरिहार्यच असते व आहे', या धारणेला ती कालबाह्य झालेली असली तरीही अद्याप गोंजारलेच जाते आहे! अशा गोंजारण्यातूनच क्रांतीसाठी अपरिहार्य मानली गेलेली हिंसा शोषणमुक्तीच्या दृष्टीने साजेशी राहत नाही. याचे भान सुटूनच क्रांतीत हिंसा कर्मकांडाच्या स्वरूपातच ठेवली जाते व शिल्लक ठेवली गेलीही आहे. यामुळे 'क्रांती म्हणजे हिंसा व हिंसेविना क्रांतीची कल्पनाच करवत नाही', याची मानसिकता तयार होते व ती जगात सर्वत्रच तयार झाली आहे. पण, यातूनच हिंसा कालबाह्य झाल्यामुळे क्रांतीही कालबाह्य झाल्याचेच मानले जात असते! अर्थात, हे क्रांतीच्या अर्थाबाबतीत अज्ञान बाळगण्यातूनच होत असल्यामुळे 'क्रांती' या संकल्पनेविषयी एक उपेक्षेचा भावही निर्माण झालेला आहे. पण, तो प्रामाण्यवादी परंपरेचाच द्योतक असल्यामुळे यातून दंडविधानाला व दंडनीयतेला अबाधित ठेवण्याचा एक कलुषित भाव निर्माण झाला आहे व तो अर्थातच क्रांतीच्या मूळ भूमिकेपासून वेगळाच झाल्यामुळे तुच्छनीय वा तिरस्करणीय ठरण्याच्या अवस्थेत येऊन पोचलेला आहे! म्हणून, क्रांतीची पारंपरिक प्रामाण्यता म्हटली जाऊ शकते ती स्वीकारली जाणे व या परंपरेला पुष्ट करणारी ग्रंथप्रामाण्यताही स्वीकारणे माणसाच्या विवेकशीलतेला आव्हान देणारे असल्यामुळे बुद्धी व भावनेच्या पातळीवर या अशा प्रामाण्यवादी परंपरेचा स्वीकार करणे शक्य होत नाही व शक्य होणारही नाही, हे निश्चित आहे!

**५. संस्कृतीच्या घडणीत व्यवधान :**

दंडविधानाला व दंडनीयतेला पर्याय शोधण्याच्या प्रयत्नात जरी 'क्रांती'चा पुरस्कार केला जातो, तरी क्रांतीत हिंसा अपरिहार्य असल्याचेच जेव्हा ठरवले जाते व मानलेही जाते, तेव्हा 'क्रांती' हिंसेचा पुरस्कार करणाऱ्या प्रामाण्यतेच्या अथवा ग्रंथप्रामाण्यतेच्या भोवऱ्यात अडकून निरर्थक अथवा प्रयोजन नसलेलीच होत जाते! म्हणून, क्रांतीतून शोषणविरहिततेची वस्तुस्थिती निर्माण होत नाही व हिंसेच्या पुरस्कारामुळे शोषणाची प्रक्रिया हुकूमशाहीच्या परिस्थितीतूनच सुरू ठेवली जाते. म्हणून, क्रांती हिंसक असते व हिंसकच असू शकते, ही जी मान्यता झालेली दिसते आहे, ती अज्ञानमूलक स्थितीतलीच होऊन राहते आहे, हे अनुभवांती इतिहासात सिद्ध होत झाले आहे. अशा स्थितीत दंडविधान व दंडनीयता कायम ठेवून चालणारच नसल्यामुळे क्रांतीला आश्वासक व पोषक अशी वृत्ती धारण करावीच लागते. म्हणूनच ही वृत्ती ज्यातून येते किंवा येऊ शकते, त्या स्रोतांच्या उगमांकडे जावे लागते! हा स्रोतांचा उगम क्षमाशीलतेतून निर्माण होऊ शकतो व होतो. यातून क्षमाशील वृत्ती धारण करता येऊ शकते. कारण, क्षमा-शीलता अपराध वा गुन्ह्याला संधी उपलब्धच होऊ नये या एका संकल्पातलीच असू शकते व आहे. ती तशी असली तरच अपराध वा गुन्ह्यातून मुक्तता संभवू शकते. कारण, अपराध वा गुन्हा करण्याला संधी असल्यामुळेच तो घडत असतो. म्हणूनच तो परिस्थितिजन्यच असतो व असू शकतो, हे लक्षात घ्यायला हवे; हे लक्षात घेणे शक्यही आहे. कारण, परिस्थितिजन्य गुन्हा वा अपराध परिस्थितिबदलातून नाहीसा करणे शक्य असल्यामुळे गुन्ह्याला वा अपराधाला निव्वळ दंडविधान वापरून दंडनीय करीत जाण्याची गरजच नसते व नाही. याची शक्याशक्यता पडताळून घ्यायला हवी. अर्थात, हे शक्य आहे किंवा काय हे यानंतरच कळू शकेल.

उपभोगाची वृत्ती उपभोगवादाच्या आग्रहातूनच बनत असते व बनत जाते. अर्थातच या वृत्तीतून अपराध वा गुन्हे घडत असतात. याची योग्य ती दखल अद्याप घेतलीच जात नाही. कारण, जगण्याचा व जीवनाचा दृष्टिकोणच उपभोगाची जास्तीत जास्त संधी प्राप्त करण्याचा ज्या वेळी होत असतो, त्या वेळी माणूस गुन्ह्याकडे वा अपराधाकडे वळत असतो. म्हणून, उपभोगाच्या अतिरेकी आकांक्षेतूनच गुन्हे वा अपराध घडतात, असेच सर्वसामान्यपणे दिसून येते. याला जगण्यातली व जीवनातली विकृतीही म्हटले जाते. तेव्हा, याचा सरळ संबंध संयमाचे महत्त्व जाणलेच जात नसण्याशी आहे. म्हणूनच संस्कृतीच्या घडणीत व्यवधान निर्माण होत असते. यातूनच जीवनात विकृतीचा संचार होतही असतो, हे अर्थातच

जाणून घ्यायला हवे!

**६. धर्मपीठांच्या अनुशासनामुळे संस्कृती लयाला जाते**

माणसाच्या जगण्यातून त्याच्या जीवनाची घडण होत असते. म्हणूनच मानवीय संस्कृती उदयाला येत असते. अर्थात, जगणे हे जेव्हा संयमाच्या मर्यादेत असते, तेव्हाच संस्कृती घडण्यास संधी निर्माण होत असते! अर्थात, उपभोगाचा अतिरेक किंवा अनियंत्रित उपभोगाची दुरवस्था संस्कृती घडण्यास बाधक होत असते व झालीही आहे. म्हणूनच संस्कृती घडवण्याला पोषक-प्रेरक परिस्थिती निर्माण करण्याची प्रक्रिया सतत म्हणजे अबाधित स्वरूपात सुरू ठेवण्याची गरज असते व ती खंडित होऊ नये याची काळजीही घ्यावी लागते. यातूनच याच्या काही परंपरा अस्तित्वात येत असतात व आल्याही आहेत. पण, त्याकडे दुर्लक्ष झाल्यामुळे त्या परंपरा खंडित होऊन नाहीशा होण्याच्या स्थितीला येऊन पोचल्या आहेत. या परंपरांच्या अभावातूनच माणसाची व मनुष्यसमूहांची भांबावलेली परिस्थिती निर्माण झाली आहे. या परंपरेतच संयमाची जाण ठेवणारी वा जाण ठेवू शकणारी मानवीय संस्कृतीची घडण होण्यासाठी संधी उपलब्ध होत असते. याचा अभाव झाल्यामुळे भांबावलेल्या मन:स्थितीत मानवीय जीवन दिशाहीन अवस्थेत जाऊन पोचत असते. ज्या वेळी संस्कृती पोषक व प्रेरक प्रक्रिया लक्षात घेऊन ती चालवली जाते, त्यातूनच संस्कृती घडण्याची शक्यता जाणलीही जाते, त्याच वेळी धर्म-संप्रदायांची प्रक्रिया व त्यांची परंपराच प्रामुख्याने नजरेसमोर येत असते व ती सहजपणे नजरेसमोर येतेही! पण, धर्म-संप्रदायांतल्या परंपरा या जेव्हा धर्मपीठांच्या नियंत्रणात असतात व चालतात, तेव्हा त्यातूनच मानवीय संस्कृतीची घडण व संवर्धनाचा दृष्टिकोण धर्मपीठांना मान्य असाच ठेवला जातो व ठेवला गेलाही आहे. म्हणून धर्मपीठे जी शिस्त लावत आले व लावतात, ज्याला 'धर्मपीठाचे अनुशासन' या नावाने प्रतिष्ठित केले जाते, ते मनुष्यसंस्कृतीपेक्षा धर्मविस्ताराच्या अपेक्षेतलेच असते व असू शकते. यातूनच याला संघटित धर्माचेच स्वरूप प्राप्त होणे अपरिहार्य होत असते. म्हणून, धर्मपीठे त्यांच्या संघटितपणातून जे अनुशासन देतात, ते पारलौकिकतेतलेच असू शकते व असते. वर्तमानात जगण्यातून मनुष्यजीवन घडावे, याच्याशी त्याचा दूरान्वयानेही संबंध नसतो व नाही. म्हणून, मनुष्य-जीवन घडण्याऐवजी एक अशी काही जीवनापासून वेगळी पाडणारी विन्मुखता यातून येते, की वर्तमानात जगण्याशी त्याचा सुतराम संबंध नसतो व पारलौकिक आस्थेतच जगण्याची झिंग त्यातून येतही असते. म्हणून, यातून मनुष्यसंस्कृती घडण्याची व घडलेल्या संस्कृतीचे संवर्धन करण्याची शक्यताच नसते. अर्थात धर्म-संप्रदायांवर अवलंबित राहिल्याने मनुष्यसंस्कृती घडण्यास व तिच्या संवर्धनास संधीच उपलब्ध होत नसते. यातूनच धर्म-संप्रदायांची संघटित गुलामगिरी अनिच्छेनेच स्वीकारावी लागते! कारण, धर्म-संप्रदायांच्या पीठांनी त्यांच्या लादल्या गेलेल्या अनुशासनातून माणसाचा धर्म उदयाला येतच नसतो व नाही. जर तो कदाचित अपघात होऊन उदयाला आलाच, तर शीघ्र गतीने लयासही जातो! हीच याची वस्तुस्थिती होऊन बसलेली आहे. तेव्हा, धर्म-संप्रदायांचे अनुशासन माणसाला स्वत:चा धर्म प्राप्त व्हावा व तो अनुसरता यावा या उद्देशातले नसते व नाही, हे लक्षात घ्यायला हवे. कारण, धर्म-संप्रदायांनी जी पीठे निर्माण केली व जे अनुशासन दिले, ते माणसाचा धर्म माणसाने अनुसरावा व पाळावा अशा हेतूतले मुळातच नसल्यामुळे पारलौकिक लाभाच्या भ्रामकतेत झिंगत जगण्यास भाग पाडणारेच ते झाले आहे व होतेही आहे. तेव्हा, मनुष्य-धर्माला अनुसरूनच मनुष्यसंस्कृती घडवायची असते व घडवायला हवी आहे. त्यासाठी संघटित धर्म व त्याच्या धर्मपीठांचा उपयोग होत नाही व होणारही नाही हे स्पष्टच आहे. कारण, पारलौकिकतेच्या भ्रमातच जगण्यास संघटित धर्म व त्यांची धर्मपीठे माणसांना भाग पाडतात व हे भाग पाडणारेच माणसाला व मनुष्यसमूहांना त्यांच्या अनुशासनात ठेवतात व ठेवत आलेही आहेत! म्हणून, धर्म-संप्रदायांचे अनुसरण केल्याने मनुष्यसंस्कृती घडत नसते व जी आधी घडलेली असेल ती लयासही जाते, याचे भान माणसाला ठेवता यायला हवे. हे भान हरपण्याच्या अवस्थेतच मनुष्यसंस्कृती लयाला जाण्याची परिस्थिती निर्माण होते!

**७. सामाजिक धारणेतला संतांचा भक्तिमार्ग :**

यातून भक्तिमार्गाला व भक्तिमार्गी संतांना वेगळे काढूनच मनुष्यसंस्कृती घडवण्यास ते प्रेरक-पोषक कसे

ठरतात व ठरलेले आहेत, यावर विचार करायला हवा. ईश्वराची भक्ती करणे हाच भक्तिमार्ग आहे. पण, ईश्वर सर्वव्यापी आहे अशा समजुतीतूनच भक्ती करावयाची असते, हेच यात मानले गेले आहे. म्हणून, सर्वत्रच ईश्वराचे दर्शन होत राहावे व ते होतच असते, अशीच एक भक्तिमार्गाची धारणा झालेली आहे. यात धर्मपीठांना मान्य असलेला अव्यक्त ईश्वर हा सर्वव्यापी आहे, असा भाव धर्मपीठातल्या धर्म-संप्रदायांच्या शिकवणी-तून अभिव्यक्त होत नाही. कारण, धर्मपीठांचे अनुशासन पाळले गेल्यानेच ईश्वरप्राप्ती होऊ शकते, असाच भाव धर्मपीठांच्या अनुशासनातून अभिव्यक्त होत असतो. भक्तिमार्ग याहून वेगळा व स्वतंत्र आहे. यालाच ईश्वराची भावभक्ती असे संबोधिले गेले आहे. यानुसारच भक्तोला 'अनुशासन' नसते व फक्त 'भाव'च असतो, असे मानले जाते! तेव्हा, ईश्वराचे अस्तित्व मानायचे किंवा काय, हा एक श्रद्धेचा स्वतंत्र विषय आहे. ईश्वराचे अस्तित्व मानले तर ती श्रद्धा व ईश्वराचे अस्तित्व मानलेच नाही तर ती अश्रद्धा, असे एक वर्गीकरण यातून केले जाते. पण, श्रद्धेला अनुमोदन देणे व अश्रद्धेला दंडित करणे असा भाव संतांनी स्वीकारलेल्या भक्तिमार्गात नसतो व नाही. म्हणून, संतांच्या भक्तिमार्गात दंडविधान नाही व कोणालाही दंडित केले जात नाही! पण, संघटित धर्म-संप्रदायांत मात्र अश्रद्धेला दंड दिला जातो. म्हणून, दंडविधान व दंडनीयता दोन्ही संघटित धर्म-संप्रदायांच्या अनुशासनात पाळलेच जातात. तेव्हा, धर्म-संप्रदायांच्या धर्मपीठाहून संतांचा भक्तिमार्ग स्वतंत्र आहे व त्याला नैतिक अधिष्ठान लाभलेलेही आहे, हे लक्षात घेऊनच मनुष्यसंस्कृती घडण्याची व घडवण्याची प्रेरणा व वृत्ती या दोन्ही संतांच्या नैतिक अधिष्ठान लाभलेल्या भक्तिमार्गाला आहेत, हे मान्यच करावे लागते. ईश्वराचे अस्तित्व मान्य करणे व मान्य न करणे या दोहोंचे स्वातंत्र्य संतांच्या भक्तिमार्गाने मान्य केलेलेच आहे. म्हणून, माणसांच्या बाबतीत सहिष्णुता बाळगणे हीच भक्तिमार्गाची ओळख पटवणारी खूण म्हणता येते! यामुळे भक्तिमार्गात ज्या विविध परंपरा निर्माण झाल्या, त्या मनुष्यसंस्कृती घडवण्याला व संवर्धनाला प्रेरक-पोषकच राहू शकल्या व राहिल्या आहेत. हिन्दूंचा भक्तिमार्ग संन्यास धारण केलेल्या म्हणजे परिव्राजकांच्या वृत्ती व आचरणातून अभिव्यक्त होत असतो. इस्लामचा भक्तिमार्ग अर्थातच ईश्वरनिष्ठेतला नाही. तरीही बौद्ध भिक्खू व जैन साधूंच्या परिव्राजकतेतूनच तो अभिव्यक्त झालेला आहे. येशूख्रिस्त तर परिव्राजकच होता. अर्थात, याची परंपरा एका वेगळ्या अर्थाने ख्रिश्चनांतही आहेच. महाराष्ट्रातला पंढरपूरचा वारकरी वर्षातून दोन वेळा परिव्राजक होऊनच विठ्ठलदर्शन करण्याला पंढरीची वारी करतो. म्हणूनच तो वारकरी म्हणवला जातो! रामदासी परिक्रमा करणारे असतात म्हणून ते परिव्राजकच आहेत. पांगुळ अथवा वासुदेवही परंपरा जपणारे परिव्राजकच म्हटले जातात! तेव्हा, परिव्राजकांच्या विविधांगी परंपरा अस्तित्वात आल्या असून त्या भक्तिमार्गाला चालना व उत्तेजन देणाऱ्याच असतात व आहेत! यातून एक विशिष्ट प्रकारची व परस्परविश्वासातली सामाजिक धारणा घडावी या हेतूने ती प्रेरक-पोषक राहिलेलीही आहे. अर्थात 'क्षमाशील' वृत्ती धारण केल्याशिवाय सामाजिक धारणा निर्माण होत नाही! म्हणून, भक्तिमार्गात दंडविधान व दंडनीयता या दोन्हींना स्थान प्राप्त झालेलेच नाही, हे लक्षात घ्यायला हवे.

**८. क्षमाशीलतेतले सामाजिक धारणेचे सामर्थ्य :**

जगाच्या परिस्थितीत क्षमाशीलता व दंडनीयता या दोन्ही ज्या एका वळणावर दिसतात, त्याकडे कसे पहावयाचे, ते ठरवायला हवे आहे. यामुळे यातले नेमके काय स्वीकारल्याने मनुष्य-संस्कृतीला प्रेरक-पोषक असा अभिक्रम निर्माण होऊ शकेल, हे निश्चित केले जाऊ शकेल. म्हणजे याची शक्यता आहे, हे लक्षात घ्यायला हवे. या दृष्टीने विचार करता लक्षात येते ते असे, की दंडविधान व दंडनीयता या दोन्हींचा पुरस्कार ज्या एका पद्धतीने केला जातो आहे, तो नक्कीच डोळस नसावा, असेच वाटण्याची एक जागतिक परिस्थिती निर्माण झालेली आहे. कारण, दंडविधान व दंडनीयता या दोन्ही माणसांना व मनुष्य-समूहांना सहजीवन घडवण्याची तसेच त्याचे रक्षण करण्याची स्फूर्ती वा प्रेरणा देत नाहीत व देऊ शकतही नाहीत. म्हणून, सहजीवनात जो संबंधातला विश्वासाचा सहजभाव यायला हवा असतो, तो यातून येत नाही, व येणारही नाही हे स्पष्टच आहे. कारण,

परस्परसंबंधात कोणतेही 'बळ' वापरून विश्वास निर्माण करता येत नाही. विश्वास हा नम्रपणातल्या समर्पणातूनच येत असतो. कारण, संबंधात परस्परांना नम्रपणे समर्पित झाल्याशिवाय विश्वासाचा पायाच भरता येत नाही. म्हणूनच विश्वासाचा पाया भरला जात नाही! या स्थितीत व्यक्तिस्वातंत्र्य गौण ठरते व विश्वास निर्माण करण्यासाठी नम्रतेतले समर्पणच प्रमुख ठरत असते. म्हणून, दंडविधान व दंडनीयता या दोन्ही परस्परसंबंधांच्या विश्वासातल्या अभावातले म्हणजेच परस्पराविषयी नम्रतेचा समर्पणभाव नसलेलेच असतात. याची जर यथायोग्य जाण बाळगता आली तरच दंडविधान व दंडनीयतेला पर्याय हा क्षमाशीलताच असतो हे लक्षात येऊ शकेल. अन्यथा दंडविधान व दंडनीयता मुळातच अमानवीयतेतले वा अमानुषतेतले असतात म्हणूनच ते अधिकाधिक अमानुषतेचे होत जातात व होत आहेत! जगातल्या मनुष्यसमूहांची स्थिती अमानुषतेमुळेच संस्कृतिहीनतेत प्रवेश करते आहे व यामुळेच माणसाला व मनुष्यसमूहांना संस्कृतीपासून ती वंचितही करीत आहे, असे म्हणता येऊ शकते. सध्याच्या जगाची हीच स्थिती होताना दिसते आहे. कारण, दंडविधान व दंडनीयतेला कठोरतेच्या पातळीवर ठेवूनच परिणामकारी करण्याचा प्रयत्न केला जातो आहे. याची प्रतिक्रिया होऊनच दहशतवादाला संधी उपलब्ध होत असते व होत आहे. यामुळे जगात दहशतवाद फोफावताना दिसतो आहे! म्हणून, दंडविधान व दंडनीयता या दोन्ही जेव्हा कठोर होत प्रस्तुत होतात किंवा प्रस्तुत केल्या जातात, तेव्हा त्यातून दहशतीचा व दहशतवादाचा प्रादुर्भाव होतो व तो झालेलाच आहे, हे लक्षात घ्यायला हवे. पण, म्हणूनच उपाययोजना करण्याच्या दृष्टीने क्षमाशील वृत्तीची जोपासना करायची किंवा काय, याचा निर्णय करून घ्यायला हवा आहे. पण, क्षमाशील वृत्ती ज्यातून साकार होते किंवा होऊ शकते, तेच नेमके जाणून घेणे शक्य होताना दिसत नसल्यामुळे कशालाही क्षमाशील वृत्ती म्हणण्याची प्रथा पाडली जात असावी, असेच म्हणता येण्यासारखी सध्याची स्थिती झालेली आहे. म्हणून, नेमके कशाला क्षमाशीलता म्हणावयाचे आहे, आवर्जून लक्षात घेण्याची गरज निर्माण झालेली आहे. ही गरजपूर्ती करण्याच्या दृष्टीने जे काही करता येण्यासारखे असेल ते निक्षून करायलाच हवे आहे! पण, हा एक आकलन करण्याचा तसेच आकलनाची शक्ती निर्माण करण्याचाच अतिमहत्त्वाचा प्रश्न आहे.

या प्रश्नाच्या अनुषंगानेच क्षमाशील वृत्ती समाजधारणेला प्रयोजनकारी असू शकेल किंवा काय, ते पडताळून घ्यायला हवे. दंडविधान व दंडनीयता कणखरपणे वा कठोरपणे स्वीकारल्यामुळे जी प्रतिक्रिया होते किंवा झालेली आहे, त्यातूनच दहशतीला प्रेरणा व उत्तेजन मिळालेले आहे; हे जर मान्य केले तर याच्या पर्यायाचा शोध घेताना जे पुढे येते ते क्षमाशीलताच असते. म्हणून क्षमाशीलतेतून गुन्ह्यांना वा अपराधांना आळा बसेल किंवा काय, हे जाणून घेण्याच्या प्रयत्नांचा एक भाग मानूनच अपराध्याच्या व गुन्हेगाराच्या परिवर्तनाची काहीएक प्रक्रिया असू शकत असल्यास ती लक्षात घ्यायला हवी. अपराधी वा गुन्हेगार परिस्थितीतूनच निर्माण होतात. म्हणून परिस्थितीत बदल घडून येण्याची शक्यता असल्यास व परिस्थितीत गुन्हा व अपराध करण्याला संधीच उपलब्ध होऊ शकत नसल्यास, परिस्थितीच्या बदलाची शक्यता असते, असे म्हणता येईल. पण, यासाठी गुन्हेगारांशी वा अपराध्यांशी संपर्क साधून संबंध प्रस्थापित करण्याचा प्रयत्न त्यांच्याविषयी वाटणाऱ्या सहानुभूतीतून केलाही जाऊ शकेल. या वेळी सहानुभूती ही आस्थेतलीच असू शकते. म्हणजे ती आस्थेतली असते तेव्हाच गुन्हेगाराला वा अपराध्याला सहानुभूती बाळगणाऱ्याविषयी विश्वास वाटू शकेल. याची सर्व प्रक्रियाच हृदयाशी भिडण्याची आहे. म्हणून, सहानुभूतीतून प्रेमाचा अंकुर फुटू शकतो, यावर विश्वास ठेवण्याचाही तो प्रश्न आहेच. म्हणून, 'हृदयपरिवर्तन' ही संकल्पना यातून उदयाला येत असते, व आलीही आहे. याची अनेक उदाहरणे देता येऊ शकतील. पण, ती सर्व फलदायी ठरलेली असतील, याची खात्री देता येत नाही. तरीही हृदयपरिवर्तनाची संकल्पना क्षमाशील वृत्तीतलीच असते व आहे, एवढे मात्र निश्चित आहे. प्राचीन काळातली या बाबतीतली उदाहरणे कालबाह्य म्हटली जाऊ शकतील. कारण ती कालसापेक्षच राहू शकली होती. पण, अलीकडच्या काळात कालातीत म्हणता येऊ शकेल याचे उदाहरण महात्मा गांधींचे देता येऊ शकेल. यावरून क्षमाशीलतेचा सार्वकालीन आदर्श

स्थापित होऊ शकेल, असे अर्थातच मानले जाऊ नये! पण, क्षमाशीलतेतून माणसाचे हृदयपरिवर्तन होऊ शकते, एवढे मात्र शक्य कोटीतले वाटू शकेल. याची दोन उदाहरणे देता येऊ शकतील.

साम्यवादी कामरेड हो चि मिन्ह वियतनामचे अध्यक्ष होते. ते कम्युनिस्ट विचारसरणीचा पुरस्कार करणारेच होते. क्रांतिकारी असल्यामुळे क्रांतीत हिंसा अपरिहार्यच असते म्हणून ती स्वीकारावीच लागते, असे मानणारेही ते होते! पण, 'महात्मा गांधींविषयी काय वाटते' हे जेव्हा त्यांना विचारले गेले, तेव्हा ते म्हणाले होते, की "मी जरी क्रांतिकारी मानला जातो, तरी क्रांतिकारकांचे गुरू प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष महात्मा गांधीच आहेत." (स्व. हिरेन मुखर्जी यांचा 'एक अद्वितीय नेता' हा लेख जानेवारी १९७१ साली प्रसिद्ध झालेल्या 'महात्मा गांधी : एक मार्क्सवादी परिचर्चा' या पुस्तकात प्रसिद्ध झाला त्या आधारे.) हो चि मिन्ह यांनी महात्मा गांधींची मान्य केलेली नव्हती, तरी त्यांनी महात्मा गांधींना क्रांतिकारकांचे गुरू मानण्याचे धैर्य दाखवले. यात स्पष्ट आहे, की महात्मा गांधींची अहिंसा क्रांतिकारकांनी वर्जित मानलेली नाही. हिंसक क्रांतीच्या पुरस्कर्त्यांनी अहिंसेचा स्वीकार जरी केला नाही, तरी अहिंसेत क्रांतीसाठी जे धैर्य लागते ते महात्मा गांधीजवळ होते, हे हो चि मिन्हच्या लक्षात आलेच होते! दुसरे उदाहरण अमेरिका व कॅनडाच्या शेतमजुरांचे नेते (स्व.) सीजर सावेज यांचे आहे. सीजर सावेज तसे मूळचे मेक्सिकोतले रहिवासी होते. ते व त्यांचे कुटुंबीय अमेरिकेतल्या कॅलिफोर्निया राज्यात जाऊन तिथेच स्थायिक झाले. त्यांच्याशी माझा १९८७ साली संपर्क झाला होता. त्यांच्या निवासात मी गेलो होतो, तेव्हा माझ्याबरोबर अमेरिकेत स्थायिक झालेले माझे तीन मित्र होते. सीजर सावेजशी चर्चा करून झाल्यावर संध्याकाळी आम्ही सर्व जेवणाच्या टेबलावर गेलो होतो. मी संपूर्ण शाकाहारी असल्यामुळे माझे टेबल वेगळे लावले होते. दोन खुर्च्या मांडून ठेवल्या होत्या. मी माझ्या खुर्चीत बसलो. माझ्या शेजारच्या खुर्चीत सीजर सावेज येऊन बसले. आम्ही दोघे एकाच टेबलावर जेवण करू लागलो. सहजच मी सावेजना म्हटले, की "तुम्ही माझ्याबरोबर शुद्ध शाकाहारी जेवण घेत आहात, याचे मला आश्चर्य वाटते!" तेव्हा ते लगेच म्हणाले, की "मी शुद्ध शाकाहारीच आहे. याची प्रेरणा मला महात्मा गांधींकडून मिळालेली आहे." महात्मा गांधींचा प्रभाव (स्व.) ल्यूथर मार्टिन किंग (ज्यूनियर) यांच्यावर पडलाच होता, हे मला माहीत होते. पण, सीजन सावेजवरही त्यांचा प्रभाव पडला होता, हे मला प्रथमच कळले. हो चि मिन्ह, मॉर्टिन ल्यूथर किंग व सिजर सावेज या तिघांच्या उदाहरणावरून मी महात्मा गांधींचा विचार करू लागलो, तेव्हा त्यांच्या हृदयपरिवर्तनाच्या प्रक्रियेतले सामर्थ्य काय होते हे मी जाणून घेण्याचा प्रयत्न केला. यात मला लक्षात आले, की महात्मा गांधींनी जगात सर्वत्रच स्वतःच्या हृदयातल्या प्रेमाचे प्रक्षेपण केले होते. ते अनेकांच्या हृदयाला जाऊन भिडले म्हणून, अहिंसेची सकारात्मकता (पॉजिटिवनेस) त्यांनी प्रेमाच्या प्रक्षेपणातून स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला होता. यामुळे अहिंसा ही केवळ हिंसेच्या अभावातली नकारात्मकता (निगेटिवनेस) घेऊनच राहिलेली होती, तिला महात्मा गांधींनी प्रेमाच्या प्रक्षेपणाद्वारे सकारात्मक करून दाखवले होते. मी याला क्षमाशील वृत्तीचाच प्रादुर्भाव मानतो आहे. तेव्हा क्षमाशीलतेत प्रेमाचे प्रक्षेपण करण्याचे सामर्थ्य आहे व ते अनेकांच्या हृदयांना स्पर्षून जात असते व यातूनच हृदयपरिवर्तन होत असते, असेच मला वाटत असते. अर्थात, हृदयपरिवर्तनाची प्रक्रिया विशिष्ट व महत्त्वाला चढलेल्या व्यक्तींनी आरंभिली म्हणूनच ती चालते वा चालू शकते, असे म्हणता येत नाही व म्हणूही नये. अर्थात, सर्वसामान्य वाटणाऱ्या व्यक्तींकडूनही हृदयपरिवर्तनाची प्रक्रिया चालवली जाऊ शकते व चालतेही! कारण, याशिवाय 'क्षमाशील' वृत्तीतून सामाजिक धारणा निर्माण करता येणारच नाही. म्हणून, 'क्षमाशील' वृत्तीत सामाजिक धारणेचे सामर्थ्य आहे, हे लक्षात घेऊनच गुन्हेगारांचे वा अपराध्यांचे परिवर्तन करण्याचे सामर्थ्यही त्यात आहे, असेच मानायला हवे आहे!

**उपसंहार :**

अपराध्याला किंवा गुन्हेगाराला दंडित करणे न्यायसंगत आहे. पण, हा न्याय राज्याचाच असतो व आहे. तो तसाच असू शकतो. म्हणून, सामाजिक धारणा यातून घडणे शक्य नसते व नाही. तेव्हा, सामाजिक धारणा

निर्माण करण्यासाठी सामाजिकता घडवू शकणारी व त्याला जपणारीच प्रक्रिया हवी असते. ती राज्याच्या न्यायातून अस्तित्वात येत नाही व येत नसते. हे जाणून घेऊनच न्यायाचा मानवीय दृष्टिकोण स्वीकारायचा असतो. हे जोवर शक्य होत नाही, तोवर जगातल्या लोकांचे व त्यांच्या विविध समूहांचे सहजीवन शक्य होणारच नाही, हे स्पष्टच आहे. अर्थात, सहजीवनाच्या अभावी जगाला शांतता लाभणारही नाही! म्हणूनच जगात शांततामय सहजीवन साकारण्याची शक्यताही नसते व नाही. शांततामय सहजीवन लाभावे ही इच्छा व आकांक्षा बाळगूनच क्षमाशीलतेचा स्वीकार करायला हवा. कारण हाच जगातल्या सर्वच मनुष्यसमूहांचा तरणोपाय आहे!

☆☆☆

---



अनुक्रमणिका

# आनंदविरहित अर्थव्यवस्था

डॉ. रूपा रेगे-नित्सुरे

भारताने आर्थिक उदारीकरणाच्या धोरणाचा स्वीकार करून तब्बल दोन दशके उलटून गेली. ह्या कालावधीत, कमी उत्पन्न देणाऱ्या देशांच्या रांगेतून भारत मध्यम उत्पन्न देणाऱ्या देशांच्या गटात सामील झाला. जागतिक बँक व आंतरराष्ट्रीय नाणेनिधीने सुचविलेल्या मार्गावरून जाणाऱ्या आफ्रिकन देशांची १९८० च्या दशकात जी गत झाली तशीच फटफजिती भारताचीही होणार, हे टीकाकारांचे भाकीत व्यापक अर्थाने फोल ठरले.

ह्या दोन दशकांत भारताचे एकूण राष्ट्रीय उत्पन्न जवळजवळ चौपटीने वाढले तर दरडोई राष्ट्रीय उत्पन्न अडीच पटीने वाढले. भारतीय अर्थव्यवस्थेत अनेक रचनात्मक बदल घडून आले. कृषिक्षेत्राचा राष्ट्रीय उत्पन्नातील हिस्सा ३४% वरून १६.६% पर्यत घसरला तर सेवाक्षेत्राचा हिस्सा ४२.७% पासून ५७.७% पर्यंत वाढला. संगणक, सॉफ्टवेअर, दूरसंचारण अशा आधुनिक सेवांबरोबरच आरोग्य, पर्यटन, वित्त, दळणवळण, अतिथीसेवा, इत्यादींचे जाळे झपाट्याने विस्तारले. भारतामधून होणाऱ्या निर्यातीत संख्यात्मक तसेच गुणात्मक बदल घडून आले. निर्यातीचे भारतीय राष्ट्रीय उत्पन्नाबरोबर असलेले गुणोत्तर ६.९% पासून २१.२२% पर्यंत वाढले.

निर्यातीमधील कृषिक्षेत्रातील वस्तूंबरोबर, सेवाक्षेत्र तसेच यांत्रिक निर्मितीचे प्रस्थ वाढले. आंतरराष्ट्रीय व्यापारापासून ते पर्यावरणसंबंधातील जागतिक वाटाघाटीत भारताच्या आवाजाला जबरदस्त वजन प्राप्त झाले. भारतातील बचतीचा दर २२.८% पासून ३४% पर्यंत वाढला तर गेल्या दशकात (२०००-२०१०) गुंतवणुकीचा दर अत्यंत मजबूतपणे ३६% च्या आसपास राहिला. भारतीय शेअरबाजारातील भांडवलीकरणाचे जगाच्या भांडवलीकरणातील प्रमाण ०.४% पासून २.९% पर्यंत वाढले. फोर्ब्स मासिकातल्या अब्जाधीशांच्या रांगेत जेमतेम एखादी भारतीय व्यक्ती असायची. आता ती संख्या ५०च्या आसपास असते.

परकीय गुंतवणुकदारांसाठीही भारताचे आकर्षण वाढत राहिले. गेल्या वीस वर्षांत, परकीय गुंतवणूकदारांनी भारताच्या उद्योगक्षेत्रात थेटपणे (direct) केलेली गुंतवणूक सरासरी प्रतिवर्ष ३३.३४% एवढ्या वेगाने वाढत राहिली. भारतीय उद्योगांमध्ये अनेक रचनात्मक बदल घडून आले व त्यांची उत्पादनक्षमताही झपाट्याने वाढली. भारतात अनेक अव्वल, जागतिक दर्जाच्या कंपन्यांचा उदय झाला, जसे की इन्फोसिस, विप्रो, टाटा कन्सल्टन्सी सर्व्हिसेस, टाटा मोटर्स, भारती इत्यादी. अनेक भारतीय उद्योजकांनी, भारताबाहेर परकीय देशांमध्ये स्वतःचे उद्योग स्थापन केले. टाटा व रिलायन्ससारख्या कंपन्या त्यांच्या एकूण उत्पन्नातील ५०% पेक्षा जास्त उत्पन्न त्यांच्या परदेशातील उद्योगांमधून कमावतात, हे सर्वश्रुतच आहे. आज इतरही अनेक कंपन्यांनी, जशा की गोदरेज कंझ्युमर प्रॉडक्ट्स, डाबर, मारीको, क्रॉम्पट्न ग्रीव्ह्ज, जी. एम. आर., इस्सार ग्रुप तसेच विविध औषध कंपन्यांनी आपल्या उद्योगांचा विस्तार भारताबाहेर एकतर नेला आहे किंवा नेण्याच्या प्रयत्नात आहेत.

भारताने गेल्या वीस वर्षांत साधलेल्या ह्या प्रगतीत, सातत्याने वाढत राहिलेल्या उपभोगखर्चाचे योगदान फार महत्त्वाचे आहे. भारताच्या एकूण राष्ट्रीय उत्पन्नापैकी जवळजवळ ६०% उत्पन्न भारतामध्येच खर्चले जाते. भारताची स्वतःची (अंतर्गत) बाजारपेठ अशी भक्कम असल्यामुळे २००७-०८ पासून सुरू झालेल्या जागतिक मंदीची विशेष झळ भारतीय अर्थव्यवस्थेला लागली नाही.

भारताची अंतर्गत बाजारपेठ भक्कम असण्यात, ह्या देशातील तरुण पिढीचा फार मोठा वाटा आहे व तो टिकूनही राहणार आहे. आजमितीला, एकूण लोकसंख्येपैकी ३०% भारतीय माणसांचे वय १५ वर्षांहून कमी तर जवळजवळ ६०% माणसांचे वय ३९ वर्षांहून कमी आहे. खऱ्या अर्थाने भारत एक तरुण देश आहे. तरुण माणसांची मिळविण्याची व खर्च करण्याची क्षमता नेहमीच

अधिक असल्यामुळे, भारतीय अर्थव्यवस्थेत उपभोगाचे प्रमाण वाढते राहिले आहे.

२०२० सालापर्यंत जवळजवळ १४ कोटी एवढे तरुण भारतीय, जागतिक कामगारदलात (work force) दाखल होतील, असा अंदाज आहे. थोडक्यात सांगायचे तर आपल्या देशासाठी मिळविण्याचे व उधळण्याचे प्रमाण वाढतच जाणार आहे. त्यात घरे, मोटारी किंवा कुठल्याही (महागड्या) टिकाऊ उपभोग्य वस्तू खरीदण्यासाठी आजच्या तरुण पिढीवर बचतीचं बंधन नाही. बँकांकडून तसेच वित्त कंपन्यांकडून अगदी सहजपणे कर्जे मिळू शकतात. कुठल्याही टिकाऊ उपभोग्य वस्तूंकरता भारत एक मोठी बाजारपेठ बनला आहे. भ्रमणध्वनींचीच गोष्ट घ्या. इंग्लंडच्या एकूण लोकसंख्येच्या दसपट एवढ्या संख्येने आज भारतात भ्रमणध्वनी वापरात आहेत. शिवाय हा आकडा फुगतच चालल्यामुळे जगातील मोठमोठ्या दूरसंचारण कंपन्या भारताकडे वळत आहेत. भारतातील करमणुकीची साधनेही वाढत चालली आहेत. आजमितीला एकूण ५०० दूरदर्शन वाहिन्या भारतामध्ये कार्यरत आहेत. हॉटेल उद्योग, व्यायामशाळा, फॅशन प्रशिक्षण केंद्रे, सौंदर्य-प्रसाधने, तयार कपडे इत्यादी उद्योगांना बरकतीचे दिवस आले आहेत व त्यांच्यासाठीची मागणीही अलवचीक असल्यामुळे अर्थव्यवस्थेच्या चढ-उतारांमध्येही हे उद्योग ताठपणे टिकाव धरू शकत आहेत. मोटारी व दुचाकींच्या भारतामधील उद्योगाचे जगातील स्थान सातवे असून, ह्या उद्योगातही झपाट्याने वाढ होत आहे. गेल्या दहा वर्षांत, भारतामधील रस्त्यांची रुंदी विशेष वाढली नसली तरी मोटारगाड्यांची संख्या साडेतीनपटीने वाढली.

ह्या सर्वांचा मथितार्थ सर्वकाही आलबेल आहे, असा अर्थातच नाही. १९९१-९२ पासून राबविण्यात आलेल्या आर्थिक सुधारणांमुळे एकूण प्रगतीचा वेग वाढला असला, तरीही विषमतेचे प्रमाणही जबरदस्त वाढले आहे. कृषिक्षेत्र व उद्योग/सेवाक्षेत्रे, ग्रामीण भाग व शहरे, प्रगत व अप्रगत राज्ये, अधिक कुशल व कमी कुशल कामगार ह्या सर्वांमधील आर्थिक दरी वाढली आहे. अधिक उत्पन्न देणाऱ्या राज्यांमधील दारिद्र्य-रेषेखालील लोकांचे प्रमाण झपाट्याने कमी झाले असले तरीही बिहार, छत्तीसगढ, झारखंड, मध्यप्रदेश, ओरिसा, राजस्थान व उत्तरप्रदेश ह्या राज्यांना दारिद्र्य हटविण्यात विशेष यश मिळालेले नाही. पायाभूत सुविधांची कमतरता, नैसर्गिक साधनसंपत्तीचा सातत्याने होत राहिलेला ऱ्हास, हवामानबदल इत्यादी प्रश्न भारतासाठी उग्र बनत चालले आहेत. ही सर्व आव्हाने निश्चितच गंभीर स्वरूपाची आहेत व त्यांच्या बाबतीत तोडगा काढण्यात, ठोस उपाय-योजना करण्यात जर आपण कमी पडलो, तर आतापर्यंत साध्य केलेली प्रगती टिकवून धरण्याबाबतीत गंभीर प्रश्न-चिन्हे निर्माण होतील, ही वस्तुस्थिती आहे.

मात्र प्रस्तुत लेखाचा उद्देश भारताने गेल्या दोन दशकांत साधलेल्या प्रगतीमधील सशक्त व दुर्बळ बाजू तपासून बघण्याचा नाही. उलट, समाजाच्या ज्या वर्गांमध्ये समृद्धी निश्चितपणे वाढली आहे, त्या वर्गांची झपाट्याने बदललेली व बदलत राहणारी जीवनशैली त्या वर्गांकरता तसेच एकूण समाजाकरता स्वास्थ्य व विकासाच्या दृष्टीने खरोखरच अनुकूल ठरते आहे का? ह्या प्रश्नाचा वेध घेण्याचा प्रयत्न ह्या लेखात केला आहे.

गेल्या काही वर्षांत, भारतीय धोरणकर्त्यांनी, आपल्या देशाच्या आर्थिक वाढीची गती टिकवून धरण्यासाठी उपभोग खर्चास (Consumption expenditure) उत्तेजन देणाऱ्या तंत्रांचा अवलंब केला आहे. १९९० च्या दशकात आर्थिक सुधारणांचा जो वेग आपल्या देशाने अनुभवला, तो हळूहळू मंदावत गेला. नव्या शतकातील पहिल्या दशकात, पुन्हा एकदा राजकारणाचे अर्थकारणातील प्राबल्य वाढले. जेव्हा जेव्हा आर्थिक वाढीची गती मंदावण्याचे कालखंड आले, तेव्हाही जास्त भर हा उपभोगखर्च वाढविणाऱ्या तंत्रांवर देण्यात आला.

गुंतवणुकीचे प्रमाण वाढविण्यासाठी धोरणांमधील त्रुटी कमी करण्याऐवजी भसाभसा व्याजदर कमी करणे, अर्थव्यवस्थेतील पैशाची गंगाजळी वाढविणे, शेअर मार्केट-मधील उत्साह टिकवून ठेवण्यासाठी सतत छोटी-मोठी प्रेरके (incentives) पुरवत राहणे इत्यादी उपाययोजनां-वर राजकीय धोरणकर्त्यांनी जास्त भर दिला आहे. त्यामुळेच आज पायाभूत सुविधांच्या तुटवड्यामुळे, दफ्तर-दिरंगाईमुळे, कृषिक्षेत्राच्या मंदावलेल्या उत्पादकतेमुळे, एकूणच "पुरवठा" वाढण्याच्या दृष्टीने अनेक मर्यादा निर्माण झाल्या आहेत; तर अर्थव्यवस्थेतील पैशांचे प्रमाण

वाढत राहिल्यामुळे महागाईही आटोक्यात येत नाही आहे. अर्थात ह्या वाढत्या महागाईचा चटका, गेल्या वीस वर्षांत झपाट्याने श्रीमंत झालेल्या वर्गाला विशेष बसलेला नाही, हेही खरेच आहे. ह्या वर्गाच्या सातत्याने वाढणाऱ्या मागणीमुळे आज भाजीपाला, फळे, दूध तसेच अन्य प्रथिनजन्य पदार्थांपासून (अंडी, मांस, मासे व डाळी) ते घरे, मोटारी, सोने-चांदी अशा सर्वच गोष्टींचे भाव चढे राहिले आहेत.

ह्या सामाजिक वस्तुस्थितीकडे बघताना मला अतिशय तीव्रपणे तिबॉर स्किटोव्हस्की ह्या हंगेरियन वंशाच्या अमेरिकन अर्थतज्ज्ञाचे "आनंदविरहित अर्थव्यवस्था : मानवी समाधानाचे मानसशास्त्र" हे पुस्तक आठवत राहते. गोखले अर्थशास्त्र संस्थेत शिकत असताना १९८३-८४ च्या सुमारास हे पुस्तक माझ्या वाचनात आले होते. १९७६ साली ते अमेरिकेत प्रथम प्रकाशित झाले व त्याची सुधारित आवृत्ती १९९२ मध्ये निघाली. ह्या पुस्तकात प्रामुख्याने १९७० च्या दशकात अमेरिकेत बोकाळलेल्या उपभोगवाद/चंगळवादावर टीका असल्या-मुळे, स्किटोव्हस्कींना बराच त्रास सहन करावा लागला. त्यांना बढत्या तर नाकारल्या गेल्याच, पण पुस्तकाच्या प्रकाशनासही भरपूर विलंब सोसावा लागला. अर्थ-शास्त्रातील प्रमुख विचारप्रवाहावरही ह्या पुस्तकाचा विशेष प्रभाव पडू शकला नसला, तरीही ह्या पुस्तकात उपस्थित केलेल्या प्रश्नांची दखल स्वतंत्रपणे संशोधन करणाऱ्या अनेक संशोधकांना घ्यावी लागली. आज ह्या पुस्तकात उपस्थित केलेले प्रश्न अनेक महत्त्वाच्या संशोधकांसाठी अग्रगण्य ठरले आहेत.

१९४६ ते १९७६ अशी तीन दशके स्किटोव्हस्की (ह्यापुढे सोयीसाठी "स्कि") अमेरिकेतील स्टॅन फोर्ड विद्यापीठात शिकवण्याचे व संशोधनाचे काम करत होते. १९६० पासून त्यांनी कल्याणासंबंधीच्या (Welfare) उपपत्तीवर काम करण्यास सुरुवात केली. त्यांच्या मते अर्थशास्त्रात सामान्यपणे कल्याणाचे उपभोग व आर्थिक वाढ ह्या संकल्पनांबरोबर जवळचे नाते जोडले गेले आहे. परंतु मनुष्यविकास हा केवळ परिणामात्मक (quantitative) पद्धतीने मोजणे बरोबर नाही, त्याचा गुणात्मक उहापोह होणेही आवश्यक असते स्किंच्या मते अशी अनेक उदाहरणे देता येतील, की जिथे साधनसंपत्तीची मर्यादा असतानाही उपभोगाची गुणात्मक पातळी उत्तम राहिल्याचे दिसून येते तर साधनसंपत्तीची मुबलकता असतानाही उपभोगाच्या दर्जाची घसरण झालेली जाणवते. म्हणूनच गुणात्मक पातळीवर "कल्याणा"चे मापन सावधपणे करणे आवश्यक आहे. स्किंनी अनेक वर्षे गुणात्मक पातळीची काटेकोर व्याख्या देण्याची धडपड केली व शेवटी दर्जाचा संबंध उपभोगातून मिळणाऱ्या आनंदाबरोबर जोडला. स्किंच्या मते सर्वच प्रकारच्या उपभोगातून आनंद मिळतोच असं नाही. आनंद देणाऱ्या व न देणाऱ्या उपभोग्य वस्तूंतील फरक धाडस, जोखिमा, अथक परिश्रमातून होणारी फलप्राप्ती अशा अनेक घटकां-वर अवलंबून असतो. स्किंनी आपल्या ह्या संकल्पनांचा आधार घेऊन अमेरिकेतील वाढत्या उपभोगवादावर व त्यातून निर्माण होणाऱ्या सामाजिक समस्यांवर कठोर टीका केली. आधुनिक औद्योगिक क्षेत्रात विशेषीकरणावर (Specialisation) भर दिल्यामुळे अनेक कामांमधील आनंद कमी कमी होत गेला. जेव्हा माणसं स्वतःच्या हाताने काही बनवतात व अगदी शेवटच्या टप्प्यापर्यंत त्या निर्मितीच्या प्रक्रियेत त्यांचा सहभाग असतो, तेव्हा मिळणारा आनंद दीर्घकाळ टिकून रहातो. (ह्या आनंदाची झलक सुतार, शिंपी, संगीतकार, चित्रकार, लेखक, संशोधक, गृहिणी ह्यांना अनेकवार मिळत असते.) पण आधुनिक अर्थव्यवस्थांमध्ये विशेषीकरण व विपुल उत्पादनाला (mass production) आलेल्या महत्त्वामुळे निर्मितीमधील आनंद घटण्याच्या शक्यता वाढत राहातात. स्किंच्या मते, इतर समाजव्यवस्थांच्या तुलनेत अमेरिकी समाजव्यवस्थेने उपभोगाच्या संदर्भात स्वास्थ्य, सुरक्षितता व सोपेपणा ह्या घटकांना अवास्तव महत्त्व दिल्यामुळे ह्या समाजातील उपभोगाची साधने वाढली, तरीही त्या प्रमाणात आनंदनिर्मिती होऊ शकली नाही. ते असेही म्हणतात, की अमेरिकी भांडवलशाहीत स्वास्थ्य व आळस वाढविणाऱ्या गोष्टींचा उपभोग घेण्याचे प्रमाण अतिरिक्त वाढलं असून, उत्तेजित अथवा प्रेरित करणाऱ्या सर्जनशील कार्यांसाठीचे आकर्षण कमी झाले आहे. स्किंना अभिप्रेत असलेल्या सर्जनशील कार्यांमध्ये निरनिराळ्या प्रकारची कौशल्ये, अभिजात कला (संगीत, नृत्य, चित्रकला),

बौद्धिक रचना, मानव्यशास्त्रे, गणित, साहित्य, इतिहास अशा अनेक गोष्टींचा समोवश होतो.

उच्चभ्रू समाजांमध्ये स्वास्थ्याला प्राप्त झालेल्या अतिरेकी महत्त्वामुळे उपभोग्य गोष्टींमधील धाडस, जोखिमा, काठिण्य, परिश्रम इत्यादी दीर्घकालीन आनंद निर्माण करणाऱ्या गोष्टींचा प्रभाव कमी होत गेला व अंगचुकार/क्रियाहीन श्रीमंतांचे प्रमाण वाढत गेले.

रुबिनी ह्या सद्यःकाळातील महत्त्वाच्या अर्थतज्ज्ञानेही (ज्याने २००७-०८ च्या जागतिक आरिष्टाचे भाकीत अचूकपणे वर्तवले होते) आजच्या अमेरिकी उलथापालथी-वर झोत टाकताना स्किंच्या मतांचा आधार घेतला आहे. स्किंचे पुस्तक, प्रथमतः १९७० च्या दशकात लिहिले गेले असले, तरीही त्यांची अज्ञानग्रस्त उपभोगवादावरील टीका आजही लागू पडते.

"जागतिक गुंतवणूकदारांकडून स्वस्तात मिळविलेल्या कर्जांच्या मदतीने, अर्थव्यवस्थेतील उथळ उपभोगाची साधने वाढवत नेण्याच्या प्रक्रियेचाच आज अमेरिकेला मोठा फटका बसला आहे", असे प्रतिपादन रुबिनी करतात.

अमेरिकेने स्वीकारलेली अँग्लो-सॅक्सन पद्धतीची राजवट ही उपभोगाला व उपभोग सुलभ करण्यासाठी देण्यात येणाऱ्या कर्जांना अनन्यसाधारण महत्त्व देते. आज अमेरिकेइतकीच इंग्लंड, ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड इत्यादी देशांना अशा प्रकारची राजवट स्वीकारल्याचे दुष्परिणाम सोसावे लागत आहेत. आज हे सर्व देश आंतरराष्ट्रीय ताळेबंदातील असमतोल, गृहक्षेत्रातील बुडबुडे आणि उपभोक्त्यांवरील कर्जांचा वाढता भार अशा गंभीर आर्थिक समस्यांनी गांजले गेले आहेत.

स्किंच्या मते अभिमत संप्रदायास (classical school) वाटते, त्याप्रमाणे सर्वच उपभोक्ते (ग्राहक) सुजाण नसतात. सर्व उपभोक्त्यांना स्वतःच्या दूरगामी फायद्यांची अथवा कल्याणाची उत्तम जाण असते, हे आपण गृहीत धरू शकत नाही. आधुनिक भांडवलशाही-मध्ये उपभोक्त्यांच्या निरनिराळ्या इच्छा व लहरींचे इतक्या सहजपणे समाधान होते, की त्यातून सर्वसामान्य समाजा-साठी स्वास्थ्य, तोचतोचपणा, आळस व कंटाळा निर्माण होण्याच्या शक्यता वाढतात. पण उत्तेजित होण्याची गरजही स्वाभाविकपणे माणसांना असतेच. मग अशा परिस्थितीत, उत्तेजित होण्यासाठी ह्या समाजातील माणसे अनेक प्रकारच्या अनैसर्गिक, घातकी (उदा. व्यसने, गुन्हेगारी, स्टंटबाजी इ.) अशा गोष्टींकडे वळू शकतात.

स्किंच्या मते आर्थिक विकासाबरोबरच सुसंस्कृतपणा वाढविण्यासाठीचे कृतिशील प्रयत्न समाजाच्या एकूण विकासासाठी व आनंदासाठी आवश्यक असतात. माणसाचं मन सतत काहीतरी आव्हानात्मक, सर्जनशील, भरपूर परिश्रमांची गरज असलेल्या अशा उद्योगांत रमण्याची आवश्यकता असते. सहजासहजी कुठलीच व्यक्ती सोपे, स्वास्थ्यपूर्ण व फारसे कष्ट करण्याची गरज नसलेले आयुष्य सोडून, आव्हानात्मक पद्धतीने जगण्याचा प्रयत्न आपणहून करणार नाही. ह्यासाठीच आर्थिक विकासा-इतकेच महत्त्व सांस्कृतिक विकासाला मिळणे आवश्यक आहे व राज्यकर्ते/धोरणकर्त्यांपासून सर्वच सुशिक्षित लोकांनी (ह्यात सुजाण पालकत्वाचाही समावेश होतो) ह्या बाबतीत कृतिशील असणे गरजेचे आहे.

स्किंच्या मते, उपभोक्त्यांना (ग्राहकांना) निर्मितिक्षम व आनंद देणाऱ्या अशा उपभोगांच्या प्रकारांकडे मुद्दामहून वळविण्याची गरज असते. भारतासारख्या, झपाट्याने आर्थिक वाढ होणाऱ्या देशात, अशा प्रकारचे प्रशिक्षण जर ग्राहकांना वेळीच उपलब्ध झाले नाही, तर हेच ग्राहक विपुल उत्पादन करणाऱ्या उत्पादकांच्या हातातील बाहुली बनतील व वरकरणी समृद्ध वाटणारी आपली अर्थव्यवस्था हळूहळू आनंदविरहित बनत जाईल.

अर्थतज्ज्ञांनी जितका वेळ उत्पादनातील कौशल्यांच्या निर्मितीचे महत्त्व समजून घेण्यात घालवला आहे, तितकाच वेळ सर्जनशील उपभोगासाठी आवश्यक असलेल्या कौशल्यांच्या अभ्यासासाठी देण्याचीही आज खरी गरज आहे. स्किंच्या ह्या भूमिकेमुळे, ते व्हेब्लन, रॉबर्ट फ्रँक, नाईट, केन्स व गालब्रेथसारख्या बाजारपेठांच्या लवचीकतेवर कमी विश्वास असणाऱ्या अर्थतज्ज्ञांच्या मांदियाळीत जाऊन बसले. स्किंनी अर्थशास्त्रातील अनेक महत्त्वाच्या बाबींवर संशोधन केले जसे की आंतरराष्ट्रीय व्यापार, आर्थिक वाढ व विकास, मक्तेदारी व स्पर्धा इत्यादी. पण त्यांच्या संशोधनाचा कल हा नेहमीच आर्थिक घडा-मोडींच्या कल्याणकारी परिणामांचा शोध घेण्याकडे राहिला.

अमेरिका व अमेरिकेसारख्या आर्थिक मॉडेल स्वीकारलेल्या इतर देशांच्या अनुभवांवरून – भारता-सारख्या श्रीमंतीची वरवरची चाहूल लागलेल्या देशाला शिकण्यासारखे बरेच आहे. स्किंच्या आनंदविरहित अर्थ-व्यवस्थेत सांगितल्याप्रमाणे सुजाण उत्पादकांइतकीच सुजाण उपभोक्त्यांची गरज आज भारताला सामाजिक विकासाच्या दृष्टिकोणातून आहे. त्यात भारत हा तरुणांचा देश असल्यामुळे व पुढील अनेक वर्षे तरुण राहणार असल्यामुळे उत्पादक व उपभोक्त्यांना जाणीवपूर्वक निर्मितिक्षमतेकडे वळवत राहणे, हे आपल्या समाजापुढचे सर्वांत मोठे आव्हान असणार आहे.

स्किंच्याच शब्दात सांगायचं झालं तर, "माणसे जसजशी धार्मिक कायद्यांच्या चौकटीतून बाहेर पडू लागली, तसतशी कुठल्याही व्यक्तीला स्वतःसाठी काय योग्य आहे ते निश्चितपणे ठरवता येते, असे त्यांना वाटू लागले. पण असे वाटणे फारच धाडसाचे आहे. कारण ह्यामुळेच अनेक प्रगत समाजांमधून (आर्थिक दृष्ट्या) माणसे जे निवडतात आणि माणसांना खरे समाधान कशामधून मिळू शकते ह्यांतील विरोधाभासाकडे दुर्लक्ष होत गेले."

भारताच्या वाढत्या समृद्धीमुळे उसळलेल्या उपभोग-खर्चांच्या गुणात्मक पातळीकडे पाहिले तर तिबॉर स्किटो-व्हस्कींच्या 'आनंदविरहित अर्थव्यवस्था' ह्या पुस्तकातून आपल्याला बरंच काही शिकण्यासारखं आहे, ह्याची तीव्र जाणीव होते.

(टीप : हा लेख 'हेमांगी' नावाच्या मासिकात प्रसिद्ध झाला होता. त्या मासिकाच्या सौजन्याने इथे प्रसिद्ध केला आहे.)

☆☆☆



अनुक्रमणिका








# एक टिपणी : अर्थशास्त्रज्ञांसाठी काही नीतिनियम असावेत का?

श्री. सी. पं. खेर

२००८ सालच्या वित्तीय अरिष्टाचे भाकीत अर्थशास्त्रज्ञांना (विशेषत: वित्तीय अर्थवेत्त्यांना) का करता आले नाही, या प्रश्नाबद्दलची चर्चा सध्या अमेरिकेत जोरात सुरू आहे. याचे कारण हे असेल का, की त्यांचा काही नाणावलेल्या वित्तीय संस्थांशी संचालक, संचालक मंडळावरील सभासद किंवा सल्लागार म्हणून ते असल्यास संस्थेचे हित सांभाळण्यासाठी, आपल्या संस्थेची आर्थिक स्थिती उत्तम आहे, असेच (वित्तीय अरिष्ट झंझावत येत आहे असे शास्त्रत: त्यांना भावत असले तरी) प्रतिपादणे त्यांना भाग पडत असेल? असे असेल तर अर्थशास्त्रीय चर्चा करताना, चालू परिस्थितीवर लेख लिहिताना, वर्तमानपत्रातून किंवा दूरदर्शनवर धोरणावर बोलताना आपला कोणकोणत्या वित्तीय (आर्थिक) संस्थांशी कसा संबंध आहे, हे त्यांनी जाहीर करावयास हवे का? तसे त्यांच्यावर नैतिक बंधन घालावे का? असा साधकबाधक वाद उद्‌भवलेला आहे.

अमेरिकन इकॉनॉमिक असोसिएशन वगळता, इतर जवळजवळ सर्व व्यावसायिक संस्थांनी-औषधिक, विधी, तर खरेच, पण वृत्तपत्रव्यवसाय, लेखाशास्त्र, अभियांत्रिकी -व्यावसायिक नीतिनियम घालून दिलेले आहेत. शिकागो विद्यापीठाचे किंवा डार्टमाऊथ महाविद्यालयाचे धोरण असे आहे, की अध्यापकांच्या बाहेरून धनप्राप्ती मिळविणाऱ्या व्यवसायाचा संस्थेच्या हितावर आघात होता कामा नये.[१] ज्ञानाच्या बुरख्याआड लपून (पैसा मिळविणारे) बाहेर स्वहित किंवा बाहेरील संस्थेचे हित साधणारे उद्योग करता कामा नये. त्यासाठी काही नीतीनियम घालून दिले गेले आहेत. याला अर्थशास्त्रज्ञांचा अपवाद का असावा?

अर्थशास्त्रज्ञ आपल्या लिखाणातून आर्थिक घडामोडी बदलत आलेले आहेत. त्यामुळे त्याचे चालू व भावी पिढीवर परिणाम झाल्याचे दिसून येत आहे. तेव्हा त्याच्यावर काही नैतिक बंधने घालणे जरुरीचे आहे. असे प्रतिपादन करणारे "अर्थशास्त्रज्ञांची शपथ" या नावाचे पुस्तकही अलीकडे प्रसिद्ध झाले आहे.

तसेच या विषयाला अनुषंगून "कामांतर्गत" (इन्साइड जॉब) नावाची एक फिल्मही सध्या प्रसारात आहे. नेहमीप्रमाणे, एक मर्यादित छोटी पाहणीदेखील झालेली आहे. या पाहणीत दोन प्रश्न होते : एक, आलेल्या (२००६-१०) वित्तीय अरिष्टाची कल्पना कुणालाच कशी आली नाही? दोन, वित्तीय संस्थांवर नियमन/नियंत्रण असावे की नाही? या विषयांवर १९ प्राध्यापकांनी २००५ ते ०९ या काळात स्वतंत्र लेख, वर्तमानपत्रात संपादकीयाच्या शेजारी लिहिलेली टिपणे (लेख), मुलाखती, दूरदर्शनवर भाषणे किती व कशी लिहिली याचा आढावा घेतला गेला. या प्राध्यापकांचा किती व कोणत्या खासगी व सार्वजनिक संस्थांशी कसा नेमका (संचालक, संचालकीय मंडळ, सल्लागार, संस्थेचे मालक) संबंध होता/आहे, याची नोंद केली गेली व यातून (मर्यादित का होईना) काही निष्कर्ष नमूद केले गेले आहेत.

हे १९ विद्यादानी प्राध्यापक वित्तीय विषयात विशेष तज्ज्ञ म्हणून नावाजलेले होते. या १९ प्राध्यापकांत ६ प्राध्यापकांची खासगी वा सार्वजनिक (आंतरराष्ट्रीय नाणेनिधीसह) संस्थांशी कोणताच संबंध नव्हता. अन्य १३ प्राध्यापकांनी संस्थांशी असलेले संबंध लेखनातून प्रकट केलेले नव्हते. पण त्यांच्या लिखाणावर छुप्या रीतीने आपल्या संबंधित संस्थेचे (ती मोबदला देते म्हणून स्वत:चे) हित सांभाळणारा विचार असणे अशक्य नाही, असा या पाहणीचा सारांश आहे. म्हणजे, येणाऱ्या वित्तीय अरिष्टाबद्दल लिहिणे त्यांच्या अंगलट आले असते. कारण त्यामुळे आपल्या ठेवी परत घेण्यास ठेवीदारांची वित्तीय संस्थेवर झुंबड उडाली असती. तसेच वित्तीय संस्थेवर नियमन/नियंत्रण त्यांना नको होते. कारण त्यामुळे संस्थेतील घोटाळे चव्हाट्यावर आले असते.

या नाणावलेल्या विद्वानांच्या लिखाणाचा जनमानसावर







अनुक्रमणिका

सहज प्रभाव पडतो, हे उघड आहे. या विद्वान तोंडावळ्यामागे काही हेतू असेल, असा किंचितसाही संशय येत नाही. तेव्हा "आंतरः कोपि हेतू" बाळगून लिहिलेले विद्वज्जड लिखाण दिशाभूल करणारे ठरत नाही काय?

हे अनैतिक आहे असे सूक्ष्मपणे जाणवायला लागते. म्हणून नैतिकता सांभाळली जायला विद्यादानी अर्थशास्त्रीय प्राध्यापकांनी (विशेषतः वित्तीय तज्ज्ञांनी) आपल्या लेखा-भाषणांतून खासगी, सार्वजनिक संस्थांशी असलेले संबंध प्रकट केले पाहिजेत.

अमेरिकन इकॉनॉमिक असोसिएशन्सच्या स्थापनेपासून (१८८५) आजवर काही नीतिनियम घालून देण्यास सभासदांनी सतत विरोध केला आहे. नीतिनियम पाळले गेले की नाही, हे पाहणार कोण व ते मोडले गेल्यास शिक्षा कोण व कशी देणार, हे प्रश्न उरतातच.

पण संबंध प्रकट केल्याने वाचकांची दिशाभूल तरी होणार नाही, असे म्हटले जाते.

हे सारे किचकट आहे असे वाटते.

**टीप :**

१. भारतात, बाहेर क्लास उघडणाऱ्या, त्यात भाग घेणाऱ्या किंवा शेतीव्यवसायाचा जोडधंदा करणाऱ्या शिक्षकांनी यातून धडा घ्यावा.

**संदर्भ :**


- Gerald Epstein & Jessia Carrick - Hageaborth यांचा Working Paper No. 139 (October 2010) - Political Economy Research Institute.
- The Inside Job Effect - Dan Berrett (April 19,2011)
- "The Economist's Oath" - George De Martino यावरील अभिप्राय (गुगलवरून).
- Academic Economists to Consider Ethics Code - Sewell Chan (Dec. 30, 2010).


■■■

